






महाराष्ट्र शासन

मराठी भाषा विभाग

**राज्य मराठी विकास संस्था**

नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)

एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,

धोबीतलाव, मुंबई – ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६

संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com


# निवेदन

राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ही महाराष्ट्र शासनाने स्थापन केलेली स्वायत्त संस्था आहे. मराठी भाषा विभागाच्या पत्राप्रमाणे (संदर्भ क्र. मसंस २०१६/प्र.क्र.११५/२०१६/भाषा-२, दि. ३ जानेवारी, २०१७) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे '**महाराष्ट्रातील मराठी संशोधन मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य योजना**' कार्यान्वित करण्यात आली असून या योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील मराठी भाषा, साहित्य व संस्कृती वृद्धिंगत होण्यासाठी काम करणाऱ्या महाराष्ट्रातील मान्यताप्राप्त मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य करण्यात येते.

सदर प्रकल्पांतर्गत प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांना राज्य मराठी विकास संस्थेद्वारे नवभारत मासिकांचे ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर २०१७ पर्यंतच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासाठी अर्थसाहाय्य करण्यात आले होते. याअंतर्गत सदर अंकांचे संगणकीकरण करण्यात आले असून **प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांनी हे अंक जतन केलेले असल्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत**.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

# नवभारत

४८०७

वर्ष ११ वें ] नोव्हेंबर १९५७ [ अंक २



वार्षिक वर्गणी ९ रु. ] [ किरकोळ अंक १ रु.







अनुक्रमणिका

प्राज्ञपाठशाळामंडळ वाई, यांचें मासिक

वर्ष अकरावें
अंक दुसरा

# नवभारत

नोव्हेंबर
१९५७

संपादक-मंडळ
आचार्य स. ज. भागवत—श्री. हरि कृष्ण मोहनी—प्रा. वि. म. बेडेकर
प्रा. गोवर्धन पारीख का. संपादक



वार्षिक रु. ९ सहामाही रु. ५ अंकास रु. १

हें मासिक श्री. म. शं. साठे यांनीं दी प्राज्ञ प्रेस, ३१५ गंगापुरी, वाई येथें छापून प्रा. वि. म. बेडेकर यांनीं प्राज्ञपाठशाळामंडळ वाई यांचेंकरितां तेथेंच प्रसिद्ध केलें.

पत्रव्यवहाराचा पत्ता : १ संपादकीय : कार्यकारी संपादक, 'नवभारत' मासिक,
४४६ शीव रोड, मुंबई १९

२ व्यवस्थापकीय : व्यवस्थापक, ' नवभारत ' मासिक,
C/o प्राज्ञ प्रेस, वाई ( जि. सातारा )

अनुक्रमणिका






# 'नवभारत' मासिक, नोव्हेंबर १९५७

## —लेखक-परिचय—

[ खालीं दिलेल्या लेखकांशिवाय, या अंकांतील इतर लेखकांचा परिचय या वर्षीं यापूर्वी त्यांचे लेख आले त्या वेळीं दिला आहे.– का. सं. ]

**श्री. पांडुरंगराव देसाई :** उटकमंड येथें एपिग्राफी विभागांत असिस्टंट सुपरिंटेंडंट.

**श्री. शं. वा. हर्डीकर :** हैद्राबाद येथील ओस्मानिया मेडिकल कॉलेजांतील इंद्रियविज्ञान व औषधि-विज्ञान या विषयांचे माजी प्राध्यापक व कॉलेजचे प्राचार्य.

**श्री. य. रा. दाते :** शब्दकोशकार; नागपूर येथील हिं. ध. सं. मंदिराच्या संशोधन संस्थेचे प्रमुख.

**श्री. जिनेंद्र नाईक :** मुंबई विद्यापीठांतील समाजशास्त्र विभागांतील पीच्. डी. चे विद्यार्थी.

**प्रा. वि. वा. कोगेकर :** नाशिक येथील हं. प्रा. ठा. कॉलेजांतील पदार्थविज्ञानाचे प्राध्यापक.

**प्रा. वा. ल. पुरोहित :** पुणें येथील फर्ग्युसन कॉलेजांतील पदार्थविज्ञानाचे प्राध्यापक.

**प्रा. के. वा. आपटे :** मुंबई येथील बॉम्बे कॉलेजांतील संस्कृतचे प्राध्यापक.

---

अनुक्रमणिका

# साभार स्वीकार

श्री. दे. भ. शंकरराव देव व सुलभ राष्ट्रीय ग्रंथमालेचें विश्वस्तमंडळ यांनीं 'नवभारत' मासिक हें गेलीं दहा वर्षें मोठ्या परिश्रमानें व वैचारिक निष्ठेनें चालवून यापुढें हें मासिक प्राज्ञपाठशाळामंडळाच्या स्वाधीन केलें याबद्दल मी प्राज्ञपाठशाळामंडळाच्या वतीनें श्री. दे. भ. शंकरराव देव व सुलभ राष्ट्रीय ग्रंथमालेचें विश्वस्तमंडळ यांचे मनःपूर्वक आभार मानतो.

या मासिकाची वैचारिक पातळी आजपर्यंत अत्यंत उंच राखली गेली. असें मासिक केवळ वर्गणीदार व जाहिरातदार यांच्या आश्रयानें चालत नसतें, त्याकरितां अनेक व्यक्तींची उदार आर्थिक मदत मिळत गेली म्हणून हें मासिक आजपर्यंत टिकूं शकलें. अनेक विद्वान् लेखकांनीं निरपेक्ष बुद्धीनें लेखन-साहाय्यहि या मासिकास केलें. उच्च विचारांची अभिरुचि असलेल्या व्यक्तींनीं व संस्थांनीं वर्गणीदार बनून या मासिकाच्या खर्चाचा भार हलका केला. या सर्वांचें ऋण हें मासिक चालविणाऱ्यांवर फार मोठें आहे. त्या सर्वांबद्दल कृतज्ञता व्यक्त करणें हें मी कर्तव्य समजतो. लेखक, वर्गणीदार, देणगीदार व जाहिरातदार यांनीं आजपर्यंत मदत करून जसें औदार्य दाखविलें तसें त्यांनीं यापुढेंहि दाखवावें अशी प्रा. शा. मंडळाच्या वतीनें मी त्यांना विनंति करतों.

प्रारंभापासून आतांपर्यंत आचार्य स. ज. भागवत, श्री. ह. कृ. मोहनी, प्रा. वि. म. बेडेकर व प्रा. गोवर्धन पारीख यांनीं संपादक मंडळाचें सदस्यत्व पतकरून हें मासिक चालविण्यांत सहकार्य केलें. त्यांनीं यापुढेंहि पूर्ववत् सहकार्य करावें अशी मी त्यांना विनंति केली असतां ती निःसंकोचपणें त्यांनीं मान्य केली याबद्दल व विशेषतः प्रा. गोवर्धन पारीख (मुंबई विश्वविद्यालय, डीन्, आर्टफॅकल्टी) यांनीं कार्यकारी-संपादकत्वाची कठीण जबाबदारी पतकरली याबद्दल त्या सर्वांचे आभार मानावे तितके थोडेच आहेत.

विद्या व संस्कृति यांच्या संवर्धनार्थ प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई, या संस्थेनें अनेक महत्त्वाचीं कार्यें चालविलीं आहेत. त्यांत 'नवभारत' मासिक ह्या एका कार्याची अधिक भर पडली. मराठी भाषेचें वैचारिक सामर्थ्य वाढावें, मराठी वाचकास सर्व जगांतील अद्ययावत् शुद्ध व उच्च वैचारिक आंदोलनांचें दर्शन घडावें आणि मराठी माणूस हा नव्या व्यापक मानवी संस्कृतीचा सहभागी बनावा हाच या मासिकाचा मूळ उद्देश आहे. हा उद्देश सफल व्हावा या दृष्टीनें प्राज्ञपाठशाळामंडळानें मासिक चालविण्याची जबाबदारी शिरावर घेतली आहे. त्यास सर्व हितचिंतकांनीं साहाय्य करावें अशी प्रार्थना आहे.

लक्ष्मणशास्त्री जोशी

अध्यक्ष, प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

दिनांक, सौर कार्तिक शु. १, शके १८७९.

अनुक्रमणिका








## साभार पोंच

१. मराठी स्त्री : ले. दु. का. संत. प्रका. स्कूल अँड कॉलेज बुकस्टॉल, कोल्हापूर.

२. कुणा एकाची भ्रमणगाथा : ले. गो. नी. दांडेकर, प्रका. मौज प्रकाशन, मुंबई.

३. ॲरिस्टॉटलचें काव्यशास्त्र : ले. गो. वि. करंदीकर प्रका. मौज प्रकाशन, मुंबई.

४. ब्रह्मसूत्रवृत्ति : ( पदसूची संहिता) ले. बाळ गंगाधर टिळक. प्रका. टिळक महाराष्ट्र विद्यापीठ, पुणें.

५. मराठी लोककथा : ले. डॉ. सरोजिनी बाबर, प्रका. बहिःशाल शिक्षण ग्रंथमाला, पुणें विद्यापीठ, पुणें.

६. पक्षिदर्शन : ले. डॉ. म. वि. आपटे, प्रका. बहि:शाल शिक्षण ग्रंथमाला, पुणें विद्यापीठ, पुणें.

७. शैलजा : कवि वि. के. महाबळेश्वरकर, कॉन्टिनेण्टल प्रकाशन, पुणें २.

८. अन्तर्ज्ञान खरें असतें काय ? ले. रा. स. भागवत व वा. ल. चिपळोणकर, प्रकाशक– द. गो. काळे, गोविंद भुवन, आपटे रोड, पुणें ४.

९. मराठी–रशियन शिक्षक : ले. एन्. जी. मेहता, नैकात्मा प्रकाशन, पंचवटी, नाशिक.

१०. विना–औषध योजना : ले. एन्. जी. मेहता, नैकात्मा प्रकाशन, पंचवटी, नाशिक.

११. १८५७–आटलुं तो जाणजो : ले. विजयशंकर मंच्छाराम भट, दि न्यू ऑर्डर बुक कंपनी, अहमदाबाद.

१२. हिंदीको मराठी संतोंकी देन : ले. आचार्य विनयमोहन शर्मा; प्रका. बिहार राष्ट्रभाषा परिषद, पटना.

१३. मध्यएसियाका इतिहास : ले. श्रीराहुल सांकृत्यायन, प्रका. बिहार राष्ट्रभाषा परिषद्, पटना.

---









अनुक्रमणिका

श्री. पांडुरंग देसाई

# मल्लारि मार्तण्ड भैरव — संशोधनात्मक परीक्षण

## प्रास्ताविक

मल्लारि मार्तण्ड अलीकडच्या काळांत प्रसिद्धीस आलेलें दैवत आहे. हा देव विशेषतः कर्नाटक व महाराष्ट्राच्या भागांत लोकप्रिय असून याचा भक्तगण वरपासून खालच्या वर्गांत पसरला आहे. हा कर्नाटकांत सामान्यतः मैलार आणि मल्लय्य या नांवानें परिचित आहे. आणि याचें मल्हारी किंवा खंडोबा हें नांव महाराष्ट्रीयांस जवळचें वाटतें. कर्नाटकांत बळ्ळारी जिल्ह्यांतील मैलार आणि धारवाड जिल्ह्यांतील देवरगुड्ड हीं या देवाचीं प्रसिद्ध यात्रास्थळें आहेत. महाराष्ट्रांत जेजुरी या देवाचें नांवाजलेलें क्षेत्र आहे. याशिवाय या दोन्ही प्रांतांतील अनेक गांवांत या देवाचीं देउळें आणि लहान-मोठीं स्मारकें निर्माण झालेलीं आहेत.

मल्लारि मार्तण्डाविषयीं ऐतिहासिक संशोधन महाराष्ट्रांत कितपत झालें आहे याची मला स्पष्ट कल्पना नाहीं. महाराष्ट्रांत या देवाच्या उपासनेची प्राचीनता किती मागें जाते हें जाणण्याची मला उत्कण्ठा आहे. कर्नाटकांत या विषयावर झालेल्या संशोधनाची मला कमी-अधिक माहिती आहे. कन्नड वाङ्मय आणि कन्नड शिलालेखांचा अभ्यास करीत असतां मला या देवाच्या स्वरूपावर उजेड पाडणारे बरेच उल्लेख सांपडले. त्यांच्या बळावर, मल्लारि मार्तण्डाच्या मूल स्वरूपाविषयीं कांहीं लेखकांनीं व्यक्त केलेलीं मतें मला निराधार आणि शंकास्पद वाटूं लागलीं. माझ्या आधारांवरून दृष्टोत्पत्तीस येणारें या देवाचें मूळ स्वरूप निराळेंच आहे. तें कसें याचें विवेचन येथें करतों.

## वाङ्मय-दिग्दर्शन

आनंदगिरीच्या शंकरदिग्विजयांत पुढील कथा येते. उज्जयिनी नगरांत मल्ल नांवाची एक गल्ली होती. तेथें मल्लारि नांवाच्या शिवाची उपासना करणारे लोक राहात होते. हे भक्त स्वतःस मल्लारीचें वाहन म्हणजे श्वान समजून कुत्र्याप्रमाणें चाळे करीत. संचार करीत करीत शंकराचार्य तेथें गेले. त्या मल्लारि भक्तांचें श्वानवत् वर्तन हें शास्त्रविरुद्ध आहे असें शंकराचार्यांनीं त्यांना पटवून दिलें, आणि ब्राह्मण-धर्मानुसार आचरण करण्याचा उपदेश केला. (T. A. Gopinatha Rao, Elements of Hindu Iconography, Vol. II, part I, pp. 191-92 ). अभ्यंकरशास्त्री यांच्या मताप्रमाणें ( सर्वदर्शनसंग्रह, पृ. ५३५ ) आनंदगिरीचा काळ इ. स. १० व्या शतकाच्या आरंभीं होतो.

कर्नाटकांतील सुप्रसिद्ध वीरशैव पंथाचे संस्थापक बसवेश्वरांच्या कांहीं वचनांत मैलाराचे उल्लेख आढळतात. त्यांत एके ठिकाणीं जिनभक्त आणि विष्णु-भक्त यांचा बालिशपणा दाखवून कुत्र्याप्रमाणें भोंकणाऱ्या मैलार भक्तांची चेष्टा केली आहे. आणखी दोन ठिकाणचे संदर्भ पाहिल्यास, त्या काळीं आंत सण भरून वरपांगीं सजविलेल्या मैलाराच्या आकृति उभारून उत्सव करण्याची पद्धत प्रचलित होती असें प्रत्ययास येतें ( बसवनाळसंपादित बसवेश्वर-वचनें, अंक २८०, ५७० व ६३५ ). बसवेश्वराचा काळ इ. स. ११६०.

वीरशैव कवि हरिहर १३ व्या शतकांत होता. त्यानें आपल्या ग्रंथांत पूर्वकालीन शिवभक्तांच्या कथा वर्णिल्या आहेत. असा एक मोठा शिवभक्त








शंकर दासिमय्य. त्याला प्रत्यक्ष शंकराचा अवतार मानीत. हा शिवभक्त पेंबेर म्हणून मैलाराचें प्रसिद्ध स्थान होतें तेथें गेला. तेथें त्यानें आपला प्रभाव दाखवून मैलारदेवाकडून स्वतःचें छत्र धरावयास लाविलें. या चमत्कारामुळें शिवभक्त मैलारापेक्षां श्रेष्ठ अशी मैलारभक्तांची खात्री झाली ( शंकर-दासिमय्यन रगळे, तृतीय स्थळ ). या कथेचा ओझरता उल्लेख बसवेश्वराच्या एका वचनांत (अंक ५६७) आला आहे. भीमकवीच्या (इ. स. १३६९ ) बसवपुराणांत ( संधि २३ ) मैलार आणि त्याची पत्नी भैरवी यांना निर्देशिलें आहे.

मल्लिकार्जुन कवीच्या ( १७ वें शतक ) शंकर-दासिमय्य पुराणांतहि पेंबेरच्या मैलाराचें आख्यान सविस्तर निरूपिलें आहे ( संधि १३ ). त्यांत मैलाराच्या नीतिमत्तेवर शिंतोडे उडविले आहेत.

उपरिनिर्दिष्ट हरिहरकवीच्या ग्रंथांत मैलाराला मैलेय, मैलय्य, मैलुग, इत्यादि पर्यायनांवांनीं संबोधिलें आहे; आणि मैलारपत्नीला माळवी म्हटलें आहे.

वरील कथेंत येणारें पेंबेर क्षेत्र सातारा जिल्ह्यांत असून, आज त्याला पेंब्रर म्हणतात, असें शंकर-दासिमय्य-पुराणाचे संपादक श्री. हालभावीनीं दाखविलें आहे.

### तांत्रिक किंवा शाक्त पंथ

आतां या वाङ्मयक्षेत्रांतून शिलालेखांच्या क्षेत्राकडे दृष्टि वळवूं. पण त्यापूर्वी मध्ययुगीन महाराष्ट्र-कर्नाटकांतील धार्मिक व सामाजिक परंपरेवर महत्त्वाचे परिणाम घडवून आणणाऱ्या एका पंथाच्या इतिहासाचें येथें संक्षेपत: अवलोकन करणें अगत्याचें आहे. हा पंथ म्हणजे शाक्तमतीय तांत्रिक संप्रदाय. हा पंथ मुख्यत: शैवमार्गी असून यांत शक्तिदेवतेला सर्वश्रेष्ठ मानलें आहे. त्यानंतर शक्तीचा सहकारी आणि संरक्षक म्हणून शिवालाहि प्राधान्य दिलें आहे. या पंथांत शिव हा सामान्यतः भैरव, क्षेत्रपाल, इत्यादि नांवांनीं ओळखला जातो. हा संप्रदाय सिद्ध आणि नाथ पंथ म्हणूनहि प्रख्याति पावला.

ह्या शैव शाक्त मताचा प्रवर्तक मत्स्येंद्रनाथ. ह्यास शंकराचा अवतार मानलें आहे. हा ९ व्या शतकांत होता असें दिसतें. या मताचा मूळ ग्रंथ कौलज्ञाननिर्णय ( प्रबोधचंद्र बागचिसंपादित, कलकत्ता, १९३४ ) मत्स्येंद्रप्रणीत म्हणून प्रसिद्ध आहे. यांत भैरव आणि देवी यांचें संवादरूपानें निरूपण आहे. ह्या ग्रंथांत शाक्त-तत्वज्ञान प्रतिपादून अनुषंगानें शक्तिदेवता व शक्तिस्थानें वर्णिलीं आहेत. शक्तिदेवतेला देवी, योगिनी, महायोगिनी अशीं आणखी नांवें आहेत. शक्तिस्थानाला शक्ति-क्षेत्र, शाक्तपीठ, योगपीठ किंवा सिद्धपीठ म्हणत.

### शाक्त पंथाचा प्रसार

मत्स्येंद्रनाथाचें मुख्य कार्यक्षेत्र कामरूप म्हणजे आसाम प्रांत होता. सुप्रसिद्ध कामाख्या नांवाची देवी आणि तिचें शक्तिपीठ येथेंच आहे. शाक्तमताचा प्रसार पुढें इतर प्रांतांतहि झाला. या प्रसाराबरोबर शक्तिदेवतांची संख्या वाढून नवीन नवीन शक्तिक्षेत्रें निर्माण झालीं. उदाहरणार्थ, प्रथमतः शक्तिपीठें चारच होतीं. त्यांत भर पडत जाऊन कालांतरानें त्यांची गणती शेंकड्यांनीं होऊं लागली; आणि त्यांतहि महापीठ व उपपीठ यासारखे भेद करण्यांत आले. ( D. C. Sircar; The Śakta Pithas, Journal of the Royal Society of Bengal, Letters, Vol. XIV, No. I, 1948 ).

स्थूल मानानें नवव्या आणि दहाव्या शतकांत मध्य-भारताच्या मार्गानें महाराष्ट्र आणि कर्नाटक प्रातांत शाक्तमताचा प्रवेश झाला; आणि त्यानें आपला प्रभाव गाजविण्यास प्रारंभ केला. पुढील दोन तीन शतकांत सर्वत्र शाक्तमताचा पगडा बसलेला दिसून येतो.

प्रथम संक्षेपतः महाराष्ट्रांतील कांहीं शाक्त स्थळांचा उल्लेख करूं. जबलपूर जवळ भेरघाट येथें











चौसठयोगिनींचें मंदिर आहे. याचा काळ दहाव्या शतकाइतका मागें जातो. नांव चौसठ योगिनी असलें तरी येथील मूर्ति आहेत त्यांहून अधिक म्हणजे एक्याऐशीं. उस्मानाबाद जिल्ह्यांत आंबे-जोगाई शाक्तपंथाचें केंद्र होतें. ही गोष्ट तेथील शिलालेखादि प्राचीन अवशेषांचें परीक्षण केल्यास स्पष्ट होतें. कोल्हापुर हें पुरातन शाक्तपीठ होतें; आणि त्याचा उल्लेख कौलज्ञाननिर्णय ग्रंथांत आला आहे. देवी भागवतांत (इ. स. सुमारें १२००) तुळजापुरास शाक्ततीर्थ म्हटलें आहे. वेरूळ (औरंगाबाद जिल्हा) आणखी एक शक्तिक्षेत्र होतें.

या काळांत कर्नाटकाच्या निरनिराळ्या भागांत शाक्तमताचा प्रसार होऊन, अनेक गांवांना शक्ति-पीठांचें किंवा शक्तिक्षेत्रांचें महत्त्व प्राप्त झालें. याला शिलालेखादि साधनांतून पुष्कळ आधार सांपडतात. ११-१२ व्या शतकांतील अनेक कन्नड शिलालेखांत ६४ योगपीठांचे म्हणजे शक्तिपीठांचे वारंवार उल्लेख येतात. बळ्ळारी जिल्ह्यांतील हळगोंदी गांवाच्या एका शिलालेखांत महासामंत चावुंडरस नांवाचा अधिकारी भेटतो. यानें चौसठ योगिनींचा वर संपादिला होता असें वर्णिलें आहे.

दक्षिण सातारा जिल्ह्यांत जत तालुक्यांतील अंक-लगी गांवच्या एका कन्नड शिलालेखांत (इ. स. ११७९) तेथील उग्रचामुंडादेवीची प्रशंसा येते. त्यांत तिला चौसठ योगपीठांची अधिष्ठात्री आणि महायोगेश्वरी असें संबोधिलें आहे. रायचूर जिल्ह्यां-तील कुकनूर गांवच्या एका शिलालेखांत (इ. स. ११७८) तेथील ज्येष्ठादेवीला (आज तिला महा-माया म्हणतात) शक्तिदेवता म्हणून सविस्तर वर्णिलें आहे.

शंकराचार्यकृत म्हणून सांगण्यांत येणाऱ्या अष्टा-दशपीठ स्तोत्रावरून अलंपूर (रायचूरच्या शेजारीं) हें प्रसिद्ध शक्तिपीठ असल्याची माहिती मिळते. येथील जोगळांबा किंवा युगलांबा ही शक्तिदेवता आजहि प्रसिद्ध आहे. याशिवाय सवदत्तीची (बेळगांव जिल्हा) यल्लम्म, बादामीजवळची (विजापूर जिल्हा) शाकंभरी किंवा बनशंकरी, सन्नती (गुलबर्गा जिल्हा) येथील चंदला परमे-श्वरी, या शक्तिदेवता प्रसिद्धीस आल्या. तसेंच गोवा आणि गोकर्ण हीं शक्तिक्षेत्रें म्हणून गणलीं गेलीं. (तांत्रिक शाक्त पंथाविषयीं वर केलेलें विवेचन यापूर्वीं अधिक विस्तारानें माझ्या दोन लेखांत मांडलें आहे ते लेख असेः— 1. Tantric cult in Epigraphs, Journal of Oriental Research, Vol. XIX, 1952, pp. 285–88; २. कन्नड साहित्यपरिषद् पत्रिका, १९५२, जून-डिसेंबर, पानें १२८–१३२).

## त्रिपुरसुंदरीची उपासना

सामान्यतः दक्षिण भारतांत आणि विशेषतः कर्नाटकाचा दक्षिण प्रदेश आणि तमिळ प्रांतांत त्रिपुरसुंदरी किंवा ललिता या देवींची उपासना पुढच्या काळांत लोकप्रिय झाल्याचें दिसून येतें. त्रिपुरसुंदरीस्तोत्र, ललितासहस्रनाम, इत्यादि ग्रंथ या देवीच्या उपासकांना मान्य आहेत. या ग्रंथांत कुल, अकुल, कौल, इत्यादि पारिभाषिक शब्दप्रयोग येतात; आणि देवीच्या पराक्रमकृत्यांचीं वर्णनें आढळतात. त्यांच परीक्षण केल्यास ही त्रिपुरसुंदरी किंवा ललिता देवी शाक्तपंथाची देवता असावी या-विषयीं मुळींच संशय राहात नाहीं. याचें स्पष्ट प्रमाण हें कीं कुल, अकुल, इत्यादि पारिभाषिक शब्द-प्रयोग केवल शाक्तमतीय आहेत. ते अन्यत्र उप-लब्ध नाहींत. या परिभाषेचें विवरण कौलज्ञान-निर्णयादि शाक्त-ग्रंथांत केलें आहे. या स्पष्टीकरणा-प्रमाणें कुल हें शक्तिवाचक, अकुल म्हणजे शिव, इत्यादि.

शाकंभरी, कोल्हापुरची जगदंबा, आणि तुळजा-पुरची अंबाभवानी या शक्तिदेवता आजहि कर्ना-

टक आणि महाराष्ट्रांत मोठ्या प्रमाणावर पूजिल्या जातात. सवदत्तीची यल्लम्म ही शक्तिदेवता विशेषतः खालच्या वर्गांतील समाजांत फार प्रसिद्ध आहे. दक्षिण प्रांतांत त्रिपुरसुंदरीचे भक्त सर्वत्र आढळतात. याशिवाय इतर देवता तर आहेतच. वरील उदाहरणें शक्तिदेवतांच्या उपासनेचा प्रभाव आजहि आपल्या समाजांत किती व्यापक प्रमाणांत टिकून राहिला आहे याची साक्ष पटवितात. शाक्तमतांत शक्तीला विश्वाची आद्यजननी मानलें आहे; आणि मातेविषयीं स्वभावतः सर्वांच्या हृदयांत आदराची भावना वास करते; हें तत्त्व या संप्रदायाच्या प्रभावितेचें एक मुख्य कारण म्हणून सांगतां येईल.

## देवीहोसूरचे शिलालेख

प्रस्तुत जिज्ञासेला धारवाड जिल्ह्याच्या हावेरी तालुक्यांतील देवीहोसूर गांवच्या दोन शिलालेखांचें विशेष साहाय्य मिळतें. पहिल्या शिलालेखाचा काळ इ. स. १०६३. त्यांत इंदपय्य नांवाच्या अधिकाऱ्यानें माळजदेवीच्या मंदिराला मकरतोरण बांधवून दिलें असें वर्णिलें आहे. त्यांत या देवीला काळी, काळराक्षसी, रौद्रा, भैरवी, उग्रा, महाकाळी, काळयोगिनी, ह्या विशेषणांनीं संबोधिलें आहे. दुसऱ्या शिलालेखाचा काळ इ. स. ११४८. त्यांतील विषय असा : महासामन्ताधिपति, सेनाधिपति, इत्यादि बिरुदांकित रेचरस हा बनवासी प्रांताचा राज्याधिकारी होता. हा माळचिदेवीचा परम भक्त असल्यामुळें त्या देवतेचें स्थान म्हणून प्रख्याति पावलेल्या देखद होसवूर ( म्हणजे देवीहोसूर ) या गांवास नवस फेडण्यासाठीं आला. तेथें त्यानें तेथील हजार महाजन आणि स्थळीय अधिकाऱ्यांच्या समक्ष देवीला नैवेद्य आणि नंदादीप चालावा म्हणून दान दिलें. या दुसऱ्या शिलालेखांत, हें स्थळ श्रेष्ठ योगपीठ आहे; येथील माळचिदेवी योगपीठासह उदय पावलेली आहे आणि ही सर्व देवांच्या स्तुतीस पात्र झालेली आहे; अशी प्रशंसा येते. याशिवाय, पूर्वीं जनमेजय राजानें हा गांव अग्रहार करून ब्राह्मणांस दान दिला होता, असेंहि सांगितलें आहे.

हे शिलालेख आज बनशंकरीच्या देवळांत आहेत. यावरून शिलालेखांत येणारी माळज किंवा माळचिदेवी परिवर्तन पावून कालांतरानें बनशंकरी बनली असावी, असें म्हणावें लागतें. या देवीमुळ या गांवाला देवीहोसूर हें नांव प्रचारांत आलें ही गोष्ट उघड होते. हा गांव याच जिल्ह्यांतील सुप्रसिद्ध मैलाराचें क्षेत्र देवरगुड्ड या स्थळापासून फार दूर नाहीं हें लक्ष्यांत ठेवण्यासारखें आहे. ह्या वस्तुस्थितीचा पुढील विवेचनांत उपयोग होतो.

## माळजदेवी कोण असावी ?

वरील शिलालेखांतून माळजदेवी आणि माळचिदेवी या दोन नांवांनीं निर्दिष्ट झालेली देवता एकच होय, हें स्पष्ट आहे. पण ही देवी कोण ? हें नांव पुराणोक्त किंवा अन्य ग्रंथोक्त नाहीं; तें इतरत्रहि सांपडत नाहीं. यावरून मूलतः ही एक स्थळीय आणि जानपद देवता असावी असा निष्कर्ष निघतो. त्याच वेळीं हेंहि लक्षांत ठेवणें बरें कीं, पहिल्या शिलालेखांत या देवीला लावलेल्या काळराक्षसी, रौद्रा, उग्रा, इत्यादि विशेषणांवरून ती क्रूर स्वरूपाची होती.

देवीहोसूरच्या शिलालेखांवरून असा स्पष्ट पुरावा मिळतो कीं, ११-१२ व्या शतकांच्या सुमारास ही माळज किंवा माळचिदेवी कर्नाटकाच्या दक्षिण भागांत फार प्रसिद्धीस येऊन सुप्रतिष्ठित देवता मानली जात होती. बनवासी सारख्या मोठ्या प्रांताचा अधिपति या देवीची भक्ति करून नवस फेडीत होता हें उदाहरण याला पुरेसें प्रमाण आहे.

देवीहोसूरच्या शिलालेखांवरून आणखी एक सत्य प्रकाशांत येतें. तें असें : त्या काळांत माळचिदेवीला शक्ति-देवतेची पदवी मिळून तिच्या स्थानाला योगपीठाचें म्हणजे शक्तिक्षेत्राचें महत्त्व प्राप्त झालें होतें. याला आधार हा कीं, पहिल्या शिला-








लेखांत तिला भैरवी, महाकाळी आणि काळयोगिनी, या सहेतुक विशेषणांनीं संबोधिलें आहे आणि दुसऱ्या शिलालेखांत, ती योगपीठासह उदय पावली आहे आणि तिचें स्थान श्रेष्ठ योगपीठ आहे, असें वर्णिलें आहे. योगिनी, योगपीठ इत्यादि प्रयोग शाक्त परिभाषेंतले असून, निःसंशय शक्तिपंथाच्या प्रभावाचे द्योतक आहेत.

वर शाक्त पंथाच्या इतिहासाचें अवलोकन करतांना, शाकंभरी, यल्लम्म, ज्येष्ठा, चंदला, इत्यादि स्थळीय देवतांचें शाक्तदेवतांत परिवर्तन झालें असें सांगितलें. या घडामोडीचें सुस्पष्ट उदाहरण माळचिदेवीच्या वरील वृत्तांतांत सांपडतें.

याप्रकारचीं आणखी किती तरी उदाहरणें संशोधकांनीं दाखवून दिलीं आहेत. एच्. कृष्णशास्त्री यांच्या 'South Indian Images of Gods and Goddesses' या ग्रंथांत होसूरम्म, उच्चंगी अम्म, काळम्म, यल्लम्म इत्यादि देवी मूलतः ग्रामदेवी असून, पुढें त्यांना उच्च पदवीस चढवून शिष्ट देवता बनविण्यांत आलें असें प्रतिपादिलें आहे ( pages 223 ff. ). माळचीची कथा अशीच आहे.

पण ही माळज देवी किंवा माळचिदेवी कोण ? या प्रश्नाचें उत्तर अद्याप द्यावयाचें आहे. अभिनव मंगराजाच्या मंगराज निघंटु, या कन्नड कोशांत माळचि ही मैलाराची पत्नी म्हणून सांगितलें आहे. माळचीचें मालती असें संस्कृतीकरण झालें. माळज किंवा माळचि ही मराठींत म्हाळसा झाली. ही ओळख प्रस्तुत जिज्ञासेला फार उपकारक ठरते. मैलाराचें संशोधन करीत असतां प्रथम त्याच्या अर्धांगीची भेट झाली, हें चांगलें झालें. या ओळखीच्या बळावर आतां तिच्या पतीचा परिचय करून घेऊं. काव्यसाम्राज्याप्रमाणें संशोधनक्षेत्रांतहि कांतासंमितीला स्थान मिळावें, ही एक मौज खरी.

## भैरवाचें प्राधान्य

प्रस्तुत संशोधनास शाक्त संप्रदायाचें साहाय्य मिळत असल्यामुळें तेथें अधिक खोलांत शिरून पुढील वाट सांपडते की काय हें पाहूं.

शाक्तपंथांत शक्ति श्रेष्ठ असली तरी भैरवाला प्राधान्य आहे. भैरव शिवाचें एक स्वरूप असून, त्याचा स्वभाव उग्र, लढाऊ आणि वीर वृत्तीचा आहे. कौलज्ञाननिर्णय ग्रंथांत भैरव हाच शाक्त उपासनेचें महत्त्व देवीला समजावून सांगतो. प्रत्येक शक्तिस्थानांत पीठदेवतेचें म्हणजे शक्तीचें रक्षण करावयास एक भैरव असावा लागतो. शक्तीच्या उपासकानें भैरवाची पूजा केली पाहिजे. भैरवाला क्षेत्राधिपति म्हणजे शक्तिक्षेत्राचा यजमान आणि क्षेत्रपाल म्हणजे शक्तिक्षेत्राचा संरक्षक अशीं सहेतुक नांवें आहेत. भैरवाला वगळून केलेली शक्तीची पूजा निष्फळ होते. हा विषय महापीठ निरूपण ग्रंथांत वर्णिला आहे तो असा:

> क्षेत्राधिपं विना यस्तु पूजयेत् पीठदेवताम् ।
> भैरवैर्ह्रियते सर्वं जपपूजादिसाधनम् ॥

वर निर्देशिलेल्या कुकनूरच्या शिलालेखांत ज्येष्ठा या शक्तिदेवतेचा सहकारी म्हणून भैरवाची प्रशंसा केली आहे. या शाक्तक्षेत्राच्या स्थलपुराणांत भैरवरूपी क्षेत्रपालानें ब्रह्मदेवाच्या वरानें उन्मत्त झालेल्या देवजित्, मृत्युजित् आणि शत्रुजित् या तीन असुरांचा संहार केला असें वर्णिलें आहे.

भैरवाच्या मूर्ति सर्वत्र सांपडतात. त्याचे चार किंवा अधिक हात दाखविलेले असतात. शिवरूपी असल्यामुळें त्याच्या हातांत त्रिशूल, डमरू, इत्यादि शिवलांछनें आणि योद्धा म्हणून गदा, खड्ग, इत्यादि आयुधें दिसून येतात. विशेषतः खड्ग हें त्याचें मुख्य आयुध आहे. भैरवाचा चिरंतन सहचर कुत्रा, हा वाहन म्हणून किंवा सोबती म्हणून नेहमीं भैरवाच्या शेजारीं असतो. कुत्रा हा शूर, साहसी आणि प्रामाणिक प्राणि असल्यामुळें शत्रूवर चढाई किंवा शत्रूपासून संरक्षण करण्यासाठीं त्याचा फार उपयोग होतो. या दृष्टीनें भैरव आणि कुत्रा यांची सांगड औचित्यपूर्ण आहे.



अनुक्रमणिका

## मल्लारि आणि मार्तण्ड भैरव

मणि आणि मल्ल या असुरांचा संहार करण्यासाठीं शिवानें अवतार घेतला, अशी पौराणिक कथा आहे. ही कथा 'मल्लारिमाहात्म्य' या नांवानें सुप्रसिद्ध आहे. हें आख्यान मल्लारिच्या उपासनेचें मूळ असून, यास त्याच्या भक्तांनीं आधारभूत प्रमाणग्रंथ मानलें आहे.

ह्या आख्यानावरून मल्लारि हा शिवाचा अवतार आणि शिवाचें एक रूपांतर होय हें स्पष्ट होतें. मल्लारीचें स्वरूप काय हें ठरवितांना मल्लारीच्या उत्पत्तीची ही मूळ कथा लक्षांत ठेवली पाहिजे. कर्नाटकांत मैलाराला लिंग म्हणतात आणि जेजुरीचा खंडोबा हा शिवलिंगच आहे हें विसरून चालणार नाहीं.

मल्लारिमाहात्म्यांत मल्लारीला मार्तंड भैरव म्हणून संबोधिलें आहे. हें अर्थपूर्ण आहे. ह्यावरून तो मुख्यतः भैरव स्वरूपी शिव होता हें जाणलें पाहिजे. मार्तंड भैरव या नांवाच्या पुढील परिवर्तनाची कथा मनोरंजक आहे. मुरारीप्रमाणें मल्लासुराचा संहारक म्हणून मल्लारि हें नांव प्रख्यात झालें. मार्तण्डभैरव ह्या मुख्य नांवांतील मार्तण्ड हा शब्द विशेषण आहे. मार्तण्ड म्हणजे सूर्य. मार्तण्ड भैरव म्हणजे सूर्यासारखा प्रतापी भैरव किंवा सूर्यासारख्या उज्वल किर्तीचा भैरव. यासारखीं वर्णनें शिलालेख आणि वाङ्मयांत येतात. पाल्हाळ होईल म्हणून उदाहरणें देत नाहीं. मथितार्थ हा कीं, मार्तण्ड भैरव हें नांव मार्तण्डवाची नसून भैरववाची आहे.

## मार्तण्ड भैरव

दुःखाची गोष्ट सांगावयाची म्हणजे वर सुचविलेलें नाममाहात्म्य किंवा नामरहस्य जाणून घेण्याची चिकित्सक बुद्धि भक्तसमुदायामध्यें राहिली नाहीं. याचा परिणाम असा झाला कीं, या नांवांतील मुख्य भाग जो भैरव तो मागें राहिला. भैरवाचें विशेषण मार्तण्ड हेंच मुख्य नांव झालें. त्याची मल्लारि या आणखी एक विशेषणाशीं सांगड घालण्यांत येऊन मल्लारि-मार्तण्ड हें नवीन नांव सिद्ध झालें. याची पुढची पायरी म्हणजे हा देव मल्लारि किंवा मल्हार, मार्तण्ड आणि खंडोबा ( म्हणजे खड्गधारी )या एकदेशीय नांवांनींच विशेष प्रसिद्धि पावला.

मल्लारि मार्तण्ड-भैरवाचें आख्यान ब्रह्मपुराणांतील क्षेत्र खंडांत प्रतिपादिलें आहे असें सांगण्यांत येतें. पुराणोक्त म्हणून सांगण्यांत येणारीं अनेक स्थलपुराणें व क्षेत्रमाहात्म्यें नंतरच्या काळांतील रचना असल्यामुळें, त्यांच्या प्रामाण्याविषयीं संशोधकास शंका उपस्थित होते. मल्लारीचें आख्यानहि या वर्गांत येतें असें वाटतें. कारण कीं, ब्रह्मपुराणाच्या प्राचीन आणि अधिकृत प्रतींत ही कथा सांपडत नाहीं. ( उदाहरणार्थ, आनंदाश्रम संस्कृत ग्रंथमालेंत प्रसिद्ध झालेली ब्रह्मपुराणाची पोथी, इ. स. १८९५ ).

मल्लारीला शिवाचा अवतार मानल्यानंतर त्याला देवांच्या पंक्तींत मानाचें व प्रतिष्ठेचें स्थान प्राप्त झालें. पंडितांनीं त्यावर आख्यानरचना करून प्राचीन पुराणांचें प्रामाण्य आणून दिलें. शिल्प आणि मूर्तिविज्ञानांतहि त्याचा प्रवेश झाला.

वर संदर्भिलेल्या टी. ए. गोपीनाथरावांच्या अधिकृत ग्रंथांत शिवाच्या मूर्तींचे अनेक वर्ग दाखवून त्यांचीं वर्णनें दिलीं आहेत. हे वर्ग म्हणजे अनुग्रहमूर्ति, दक्षिणामूर्ति, नटनमूर्ति, संहारमूर्ति, इत्यादि. संहारमूर्तींच्या वर्गांत वीरभद्र, अंधकासुरवधकारक, गजासुरसंहारक, कामांतक, कालारि, इत्यादिकांचीं लक्षणें सांगितलीं आहेत. त्या लक्षणांत त्या त्या मूर्तींचा वर्ण, आयुधें इत्यादि विषयांचें निरूपण येतें. उदाहरणार्थ, वीरभद्राचा वर्ण तांबडा, कामांतकाचा सोन्याप्रमाणें पिवळा, कालारीचा पोंवळयाप्रमाणें लाल, इत्यादि.

वर उल्लेखिलेल्या मूर्तिविज्ञान पुस्तकांत मल्लारीचा शिवाच्या संहारमूर्तीच्या वर्गात समावेश करून मल्लारिमाहात्म्याच्या आधारावर त्याचें वर्णन दिलें आहे तें असें. मल्लारीची देहकांति सोन्यासारखी पिवळी, मस्तकावर जयमुकुट, प्रकाशमान कुंडलें, पिवळ्या रेशमी वस्त्रानें विभूषित, शरीरावर अलंकारांना आच्छादणारे सर्प, डमरु, व खड्ग हीं आयुधें, वाहन पांढरा घोडा, परिवार सप्त श्वान (Elements of Hindu Iconography, Vol. II, part I, p. 192).

## अशिष्ट जनांचा देव (?)

त्रिपुरांतक, कामांतक, वीरभद्र, इत्यादि शिवाचे अवतार सुप्रसिद्ध आणि सर्वमान्य आहेत. ह्या कथा आणि आख्यानें अधिकृत प्राचीन पुराणांत आढळतात. या प्रकारची प्रसिद्धि आणि सार्वत्रिक मान्यता मल्लारीला मिळालेली नाहीं. अधिकृत प्राचीन पुराणांत मल्लारीची अवतारकथा सांपडत नाहीं. मल्लारीची लोकप्रियता कर्नाटक आणि महाराष्ट्राच्या प्रदेशांत मर्यादित आहे. दक्षिण भारतांतील इतर भागांत आणि भारताच्या इतर प्रांतांत मल्लारीच्या उपासकांना शोधून काढणें कठिण आहे. याचें कारण काय ?

कर्नाटक-महाराष्ट्रापुरतें पाहिलें तरी हा देव सार्वत्रिक आणि शिष्टसंमत आहे असें म्हणतां येईल काय ? याचें उत्तर नकारांत द्यावें लागतें. त्याला इतिहासाची साक्ष आहे.

मागें सांगितलेल्या शंकरदिग्विजयांतील प्रसंगावरून मल्लारीची उपासना शिष्टसंमत नव्हती असें म्हणावें लागतें. शिष्टसंमत शिवाचा अवतार म्हणून मल्लारीला मान्यता मिळाली असती तर शंकराचार्य किंवा आनंदगिरीसारख्या शैवमार्गी सांप्रदायिकांना मल्लारि-उपासनेविरुद्ध उपदेश करण्याचें कारण काय ?.

वर दाखविल्याप्रमाणें कट्टर शिवभक्त म्हणवून घेणाऱ्या बसवेश्वर, हरिहरादि वीरशैव लेखकांच्या लिखाणांतहि मैलाराविषयीं अनुदार भावना प्रकट झाल्या आहेत. बसवेश्वर वचनांची चिकित्सा केली तर पुढील गोष्टी स्पष्ट होतात. १२ व्या शतकांत मलाराची आराधना मोठ्या प्रमाणांत कर्नाटकांत प्रचारांत होती. पण शिष्ट म्हणविणारे लोक तिला पराङ्मुख होते. महाराष्ट्रांत सातारा जिल्ह्यांतील पेंबरसारख्या कांहीं स्थानांत मैलारपूजक होते. अशिष्ट आणि असंस्कृत लोकांनीं मैलाराचा उदोउदो केला तरी खऱ्या शिवभक्तांपुढें या देवाची आणि त्याच्या भक्तगणांची मात्रा मुळींच चालावयाची नाहीं असें वीरशैव संप्रदायवादी प्रतिपादन करीत. यावरून वरच्या वर्गातील ब्राह्मणाप्रमाणें वीरशैव समाजहि मैलारास शिवाचा अधिकृत अवतार मानण्यास सिद्ध नव्हता हें स्पष्ट होतें.

## मैलाराचा मल्लारि

आतां शिष्टजन मैलाराला कां मानीत नव्हते याचीं कारणें शोधूं. वर देवीहोसूरच्या शिलालेखांच्या आधारावर शाक्तपंथाच्या प्रभावामुळें आधीं सामान्य स्थळीय देवता असलेल्या माळचीला शक्तिदेवीच्या पदावर कसें चढविण्यांत आलें याचें विवेचन केलें. ह्याचवेळीं हेंहि पाहिलें कीं, शाक्तसंप्रदायानुसार प्रत्येक शक्तिदेवतेला तिच्या स्थानाचें रक्षण करावयास शिवरूपी भैरव असावा लागतो. या नियमाप्रमाणें माळचीचा पति मैलार यास भैरवाची दिक्षा देऊन शिवाचा अवतार कल्पिलें असावें.

पण तत्पूर्वी माळचीचा पति म्हणविणारा मलारहि माळचीप्रमाणें सामान्य स्थळीय देव असावा. माळचि आणि मैलारांचें शाक्तदेवतांत परिवर्तन झाल्यानंतर ह्यांची प्रतिष्ठा वाढून, दूरच्या प्रदेशांत प्रख्याति पसरली असावी. खालच्या वर्गाच्या लोकांनीं त्यांचे विशेष उत्सव करण्याची पद्धत चालू केली असावी. एकीकडे हा गौरव वाढत होता, तरी दुसरीकडे वरच्या वर्गातील शिष्ट म्हणविणारे

कांहीं लोक मैलार हा मूळचा ग्राम्य देव असल्याची जाणीव ठेवून त्याविषयीं अनादरच दाखवीत. या दुसऱ्या वर्गाच्या समाजांत पहिलीं कांहीं शतकें तरी मैलाराविषयीं फारशी पूज्यभावना रुजली नाहीं. जुन्या काळची गोष्ट कशाला ? आजहि मैलाराचे भक्त वरच्या वर्गांतील लोकांपेक्षां धनगर, कुणबी, इत्यादि खालच्या वर्गांतील लोकांत अधिक प्रमाणांत आढळतात, हें पाहिल्यास मैलार मूळचा जानपद देव असावा या विधानास पुष्टि मिळते.

स्थूल मानानें ९-१० शतकांत जानपद मैलाराचें शाक्तमतीय भैरवांत रूपांतर झालें असावें असें वाटतें. भैरव म्हणजे शिवाचा अवतारच. आणि अवतार कशासाठीं, तर असुरांचा संहार करण्यासाठीं. यास्तव मणि आणि मल्ल हे असुर निर्माण झाले. त्यांचा संहार करून हा अवतार मल्लारि झाला. एवढा प्रतापशाली आणि पराक्रमी म्हणून मार्तंड-भैरव असें त्याला संबोधिलें. त्याची अद्भूत कथा वर्णन करण्यासाठीं 'मल्लारिमाहात्म्य' नांवाचें आख्यान रचलें गेलें. या आख्यानाचा प्राचीन अशा ब्रह्मपुराणाशीं संबंध जोडला गेला.

### मल्लारीचा मैलार

वरील चर्चेंत, मैलार हें नांव कर्नाटकांत सामान्यतः प्रचारांत असल्यामुळें, तेंच रूप गृहीत धरून विवेचन केलें आहे; आणि मैलार या देवाचें मल्लारि म्हणून परिवर्तन झालें असावें असें सुचविलें आहे. पण व्युत्पत्तिशास्त्राच्या दृष्टीनें या दोन नांवांतील पूर्वापार संबंधाची अधिक चिकित्सा करणें शक्य आहे. कर्नाटकांत मैलाराचें जुनें आणि मूळ नांव मल्लय्य असूं शकेल. श्रीशैलमल्लिकार्जुनावरील आपल्या संशोधनात्मक लेखांत प्रा. ए. आर्. कृष्णशास्त्री यांनीं या नांवाचें मूळ कन्नड 'मले' म्हणजे डोंगर असावा असें म्हटलें आहे (संभावने, १९४१, पृ. १९२-९८ ). ही विचारसरणी मान्य केल्यास मल्लय्य हें नांवहि मूलतः त्याच कन्नड 'मले' म्हणजे डोंगर या शब्दापासून रूढ झालें असावें हा व्युत्पत्तिक्रम पुढें चालवून मल्लय्याचा मल्लारि होऊन त्यांतून मैलार हें रूप बनलें असें म्हणतां येईल. अकाराचा ऐकार होण्याचें साम्य म्हणून याकाळीं मल्लुगी हें नांव मैलुगी असें रूपांतर पावल्याचें उदाहरण दाखवितां येतें. या सूचनेप्रमाणें मैलार नांवांत रकार कसा आला याचें उत्तर सांपडतें.

### मल्लारीचें कोडें

आधुनिक संशोधकांना मल्लारि हा कोण देव ? आणि त्याचें खरें स्वरूप काय ? हें एक कोडें होऊन राहिलें आहे. त्याचें नांव खंडोबा किंवा मल्लारि-मार्तण्ड. ध्वज पिवळा, आयुध खड्ग, वाहन घोडा, परिवार कुत्र्यांचा, उपपत्नी बाणाई, भक्तगण वाघ्या आणि मुरळी, प्रसाद पिवळा भंडार; सगळेंच विचित्र वाटतें. निरनिराळ्या लेखकांनीं आपआपल्या परीनें हें कोडें सोडविण्याचा प्रयत्न केला आहे.

प्रामुख्यानें खड्ग धारण करणारा म्हणून मल्लारीला खंडोबा हें नांव रूढ झालें असें 'मऱ्हाटी संस्कृति' या ग्रंथांत दाखविलें आहे ( पृ. १३१ ). ही व्युत्पत्ति बहुमान्य आहे. मल्लारि कार्तिकेय असावा असें आणखी एक मत आहे. त्यांत तथ्यांश नाहीं असें याच ग्रंथांत सिद्ध केलें आहे (पृ. १३०). मार्तण्ड या शब्दानें कांहीं लेखकांची दिशाभूल झाली आहे. मार्तण्ड म्हणजे सूर्य. मल्लारीच्या ध्वजादि वस्तु पिवळ्या आणि सूर्याचे किरण पिवळे. या समीकरणाच्या बळावर मल्लारि सूर्य असावा असें सुचविण्यांत आलें आहे ( B. A. Gupte, Hindu Holidays and Ceremonials, Calcutta, 1916, p. 21 ).

### सूर्य किंवा इंद्र नव्हे

मल्लारि म्हणजे सूर्य या मताला आधार नाहीं. कारण कीं वर सांगितल्याप्रमाणें मार्तण्ड हें मूळतः मल्लारीचें नांव नसून भैरवाचें विशेषण आहे. येथें मार्तण्ड याचा अर्थ सूर्य असा न करतां सूर्यासारखा प्रतापी असा केला पाहिजे.











## मल्लारि मार्तण्ड भैरव

'मऱ्हाटी संस्कृति' या पुस्तकांत मल्लारीविषयीं एक नवीन कल्पना निवेदिली आहे. ती म्हणजे मल्लारि शिव नसून इंद्र असावा (पानें १२९ आणि १३३-३६). या कल्पनेच्या समर्थनार्थ कारणें दिलीं आहेत तीं अशीं. मल्लारि वीरांचा देव आहे, शिव तसा नाहीं. मल्लारि खड्गधारी आहे, शिव त्रिशूळधारी. मल्लारीचें वाहन घोडा, शिवाचें नंदी. मल्लारीचें कन्नड नांव मल्लय्य म्हणजे पर्वतदेव. वैदिक वाङ्मयांत पर्वतांचा नाश करणारा म्हणून इंद्राची प्रसिद्धि आहे. या कारणासाठीं मल्लारि म्हणजे पर्वतशत्रु हा इंद्र असावा.

हा तर्क सदोष आहे. त्याचें थोडक्यांत निराकरण असें. वर दाखविल्याप्रमाणें मल्लारि सामान्य शिव नसून, शिवाचा भैरवरूपी वीर अवतार आहे. भैरवाचें एक मुख्य आयुध खड्ग, तें मल्लारीनें धारण केलें आहे. लढवय्या म्हणून मल्लारीला घोडा देण्यांत आला. पण घोड्याबरोबर कुत्राहि निरंतर सहचर आहे, हें विसरतां येत नाहीं. आणि ही कुत्र्याची सांगड मल्लारीच्या भैरव स्वरूपाची अचूक खूण आहे. इंद्राबरोबर कुत्रे नसतात.

मल्लारीचा डोंगरांशीं संबंध आहे. मैलाराचीं कांहीं क्षेत्रें डोंगरावर आहेत. एवढ्याच कारणासाठीं तो पर्वतशत्रु इंद्र होऊं शकत नाहीं. अनेक धार्मिक स्थळें डोंगरावर स्थापन झालेलीं आहेत. उदाहरणार्थ, श्रीशैलासारखीं शैव क्षेत्रें, तिरुपतीसारखीं वैष्णव क्षेत्रें, आणि कांहीं जैन, बौद्ध क्षेत्रेंहि पर्वतांवर आहेत. याला कारण नैसर्गिक रम्यता आणि उच्चतेची भावना. त्यांचा इंद्राशीं संबंध जोडतां येत नाहीं. इंद्राचें वाहन हत्ती, मल्लारीचें घोडा; ही विसंगतीहि येथें लक्ष्यांत ठेवावयास पाहिजे. अतिप्राचीन वैदिक इंद्राचा संबंध अलीकडच्या मैलाराशीं जोडणें म्हणजे ऐतिहासिक दृष्टीनें फार लांबची उडी वाटते. शिवाय, डोंगराचा देव डोंगराचा शत्रु कसा ?

### मल्लारीचा पिवळा रंग

मल्लारीची पिवळया रंगाशीं सांगड आहे. याचें स्पष्टीकरण असें; मल्लारीला शिवाचा अवतार मानल्यानंतर शिवाच्या संहारमूर्तींच्या वर्गांत त्याची गणना करून वीरभद्रादिकांप्रमाणें ह्याचा विशिष्ट वर्ण, वेष, भूषणें, इत्यादि निश्चित करण्यांत आलीं. या योजनेप्रमाणें मल्लारीची देहकांति, वस्त्रें आणि ध्वज यांना पीतवर्ण देण्यांत आला. घोड्याचा रंग पिवळा किंवा पांढरा. विभूतीप्रमाणें त्याच्या अंगाला फासून प्रसाद म्हणून भक्तांना देण्यांत येणाऱ्या भंडाराचा रंग पिवळा. येथें पीत वर्ण शौर्याचा द्योतक असें कल्पिलें असावें. मंगलसूचक तर तो आहेच.

### बाणाई, वाघ्या आणि मुरळी

लढाऊ मल्लारीला खड्गाबरोबर धनुर्बाणांचीहि आवश्यकता आहे. या बाणाला त्याच्या भक्तांनीं बाणाई बनवून उपपत्नीप्रमाणें त्याशीं गांठ घालून दिली.

वाघ्या मल्लारीचा परिवार असून त्याच्या सेवेस वाहिलेला भक्त आहे. कुत्रे मल्लारीला प्रिय आहेत. मल्लारि कुत्र्यांचा तांडा घेऊन स्वारीवर निघतो. मनुष्यरूपी वाघ्या स्वतःस कुत्रें समजून कुत्र्यासारखे चाळे करतो. पाशुपत मतांत भक्त स्वतःस पशु आणि शिवास पशुपति म्हणजे पशूंचें पालन करणारा असें मानतात. वाघ्याचें वर्तन यासारख्या भावनेनें प्रेरित झालें आहे.

वाघ्या या नांवाचें मूळ कन्नड भाषेंत सांपडतें. त्याचें कन्नड नांव 'ओग्गय्य'. हा शब्द 'उग्गु' धातुपासून निघाला आहे. उग्गु म्हणजे बोबडें बोलणें, अर्थशून्य किंवा अस्पष्ट ध्वनि काढणें, इत्यादि. या अर्थाला अनुरूप असें वर्तन करून, म्हणजे कुत्र्याप्रमाणें भोंकून, गुर् गुर् शब्द करून, इत्यादि प्रकारानें ओग्गय्य किंवा वाघ्या आपल्या नांवाची अन्वर्थकता पटवून देतो.

मुरळी वाघ्याप्रमाणें मल्लारीच्या सेवेला वाहिलेली भक्तीण आहे. या नांवाची व्युत्पत्ति महाराष्ट्र शब्दकोशांत दोन प्रकारांनीं दिली आहे. १. मैराळाची







भक्त मैराली, मुरली ( ळी ); २. कन्नड 'मरळी.' यापैकीं दुसरी व्युत्पत्ति बरोबर वाटते. कानडींत मरळी म्हणजे बुद्धिशून्य किंवा बुद्धिशून्याप्रमाणें बतावणी करणारी. श्वानवत् वागणाऱ्या वाघ्याचें स्त्रीपात्र हीच मुरळी. म्हणून तिचें मूळ मरळी हें कन्नड नांवहि अन्वर्थक होतें.

वाघ्या आणि मुरळी या पद्धतीचें मूळ पवित्र आणि उदात्त असावेंसें वाटतें. शाक्तसंप्रदायाप्रमाणें शक्तिक्षेत्रांत शक्तियोग साधण्याच्या उद्देशानें योगी किंवा वैरागी आणि योगिनी किंवा जोगिणी वास करीत. वर संदर्भिलेल्या कुकनूरच्या शिलालेखांत तेथील शक्तिदेवतेच्या सांनिध्यांत योगिनींचा समुदाय निरंतर रहात होता असें वर्णिलें आहे. मल्लारीचा उदय शाक्तपंथाच्या आवरणांत झाला असावा असें वर दर्शविलें आहे. शाक्तपंथांत योगी आणि योगिनींना महत्त्व दिलें आहे. हे मूलतः साधक आणि उपासक होत. शक्तियोग साधण्याच्या निमित्तानें शक्तिक्षेत्रांत एकत्रित झालेल्या या वैराग्यांत खालच्या वर्गांतील सामान्य लोकांचा भरणा अधिक असल्यामुळें त्यांच्यामध्यें ज्ञान, नीतिमत्ता किंवा तपश्चर्येचें तेज नव्हतें. म्हणून त्यांच्याविषयीं इतरांना आदरभाव वाटला नाहीं. त्यांच्या विचित्र वर्तनामुळें त्यांना ओग्गय्य म्हणजे वाघ्या आणि मरळी किंवा मुरळी यासारखीं ग्राम्य व निंदापर नांवें रूढ झालीं. कालांतरानें या वर्गाला विकृत स्वरूप प्राप्त झालें.

जेजुरीप्रमाणें सवदत्तीच्या यल्लम्मादेवी प्रीत्यर्थहि जोगिणी किंवा जोगत्व होण्याचा प्रघात आहे. हाहि शाक्तसंप्रदायाचा एक अवशेष म्हणून सांगतां येईल.

### यळकोट गर्जना

कांहीं क्षेत्रांत त्या क्षेत्रदेवतेचे विशिष्ट जयघोष प्रचारांत आहेत. सवदत्तीची यल्लम्मा आणि तुळजापुरची भवानि या देवींकरितां उधोउधो अशी गर्जना करण्यांत येते. त्याप्रमाणें मल्लारीची यळकोट गर्जना प्रसिद्ध आहे. यळकोट हा शब्द मुळांत कन्नड एळ्कोटी म्हणजे सातकोटी असला पाहिजे, मणि आणि मल्ल, असुरांचा संहार करण्यास मार्तंड भैरव निघाला त्यावेळीं त्याच्याबरोबर सातकोटि वीरगणांचा परिवार होता. या सातकोटी वीरांच्या विजयाचें स्मारक म्हणून येळ्कोटी ही गर्जना प्रचारांत आली असली पाहिजे. महाराष्ट्र शब्दकोशांत यळकोट म्हणजे सात किल्ले अशी व्युत्पत्ति सुचविली आहे, तें बरोबर नाहीं.

बळ्ळारी जिल्ह्यांतील कुडतिनी गांवाच्या एका कन्नड शिलालेखांत ( South Indian Inscriptions, Vol. IX, part I, Inscription No. 327 ) कार्तिकेय तपोवनाचा अध्यक्ष विष्णुकर ब्रह्मचारी, त्या क्षेत्राचे पांच वर्ग, एळ्कोटि म्हणजे सातकोटि महादेव, असंख्यात गण आणि इतर प्रमुख संमिलित होऊन, त्यांनीं कांहीं सामाजिक निर्बंध घालून दिल्याचें सांगितलें आहे. या शिलालेखाचा काळ इ. स. १२०७. येथील सातकोटि महादेवांचा उल्लेख महत्त्वाचा आहे. यावरून शैव संप्रदायांत याकाळीं येळ्कोटिहि एक सांकेतिक संख्या प्रचारांत होती आणि मल्लारीच्या आख्यानांत त्याचा प्रवेश झाला असावा असा निष्कर्ष काढतां येतो. मैलाराच एक प्रसिद्ध क्षेत्रहि ह्या बळ्ळारी जिल्ह्यांत आहे.

### कानडी मैलार–मराठी खंडोबा

चक्रधराचें लीळाचरित्र इत्यादि महानुभावी ग्रंथांत आणि प्राचीन मराठी वाङ्मयांत मैलार आणि म्हाळसा यांचे उल्लेख येतात. त्यांत मैलार हें नांव रूपभेदानें मैलार किंवा मैराळ असें आढळतें. मैराल हें नांव कानडी मैलारांतील शेवटचीं दोन अक्षरें पालटून निष्पन्न झालें आहे हें स्पष्ट आहे. वर सुचविल्याप्रमाणें मल्लय्याचा मल्लारि व मैलार आणि मल्हारी झाला असावा. खंडोबा हें नांव नंतरचें

वाटतें. खंडोबाच्या संप्रदायांतील वाघ्या, मुरळी आणि यळकोट इत्यादि प्रघातांचें मूळ कानडींत सांपडतें. कानडी भाषेंत येणारे मैलाराचे उल्लेख मराठी भाषेंतील उल्लेखांपेक्षां निदान एक दोन शतकें तरी जुने आहेत. या सगळयांचा निष्कर्ष खंडोबाची उपासना आणि संप्रदाय कर्नाटकांतून महाराष्ट्रांत गेली, असा काढतां येईल काय ?

## उपसंहार

लेख बराच लांबला. मल्हारि मार्तण्डाविषयीं प्रत्यक्ष आणि अप्रत्यक्ष अशीं ऐतिहासिक साधनें मला आजवर जेवढीं उपलब्ध झालीं, त्यांचें मंथन करून जे कांहीं विचार मला सुचले त्यांचें दिग्दर्शन येथपर्यंत केलें. यांतील कांहीं विचारांना निश्चित स्वरूप आहे; आणि कांहीं विचार सूचनात्मक आहेत. अधिक संशोधन केल्यास या विषयाचे धागेदोरे आणखी दूर जाऊन हें प्रतिपादन सिद्धांतरूपानें मांडतां येईल असें वाटतें. लेखाच्या आरंभीं सुचविल्याप्रमाणें महाराष्ट्रांतील संशोधनानें या विवेचनाला पूर्तता येण्याचा संभव आहे. महाराष्ट्रीय संशोधक इकडे लक्ष पुरवून सत्यशोधनास साहाय्य करतील अशी आशा बाळगतों.

शेवटीं, माझ्या या लिखाणानें भाविक मल्हारि भक्तांच्या भावना दुखावल्या असतील, तर नम्रपणें क्षमा मागतों. हा लेख लिहिण्यांत सत्यशोधनाशिवाय माझा दुसरा कोणताहि उद्देश नाहीं हें स्पष्टपणें सुचवावेसें वाटतें. परमेश्वराच्या विभूतिरूपानें आविर्भूत झालेल्या नाना देव-देवतांविषयीं माझ्या हृदयांत सदैव आदर भावनाच वास करते. आणि सत्यशोधन हाहि एक ईश्वरदर्शनाचा मार्ग नव्हे तर दुसरें काय ?

## गीता अपुरी राहिली आहे

व्यासांच्या हातून गीता अपुरी राहिली आहे हेंच खरें ! अर्जुनाचें भय किती खरें होतें, हें परिणामावरून सिद्ध झालें, एवढें प्रचंड दळ नष्ट झालें; आणि कुरुक्षेत्रावर तरुण पुरुषांच्या प्रेतांचा खच पडला; थोरामोठ्यांच्या स्त्रिया रणांगणांवर ऊर बडवींत आल्या; यांचीं वर्णनें महाभारतांत दिलेलीं आहेत. पण लक्षावधि तरुणांच्या स्त्रिया ऊर बडवीत घरींच बसल्या असतील हें कोणी कोणास सांगावयास हवें काय ? युद्धचंडीपुढें एवढा स्वाहाकार झाल्यानंतर स्त्रिया दुष्ट म्हणजे दोषयुक्त व्हाव्या, वर्णसंकर व्हावा, समाजाला नरक प्राप्त व्हावा, हें ओघानेंच येणारें होतें. अर्जुनाला हें सारें स्वच्छ दिसलें होतें; आणि म्हणून आपल्या आत्मिक भयाच्या खुलाशापेक्षां त्यानें या सामाजिक भयाचा खुलासा, तो सेनासागर दृष्टीस पडतांच, कृष्णापुढें अधिक विस्तारानें केला. जें भय अर्जुनाला प्रतीत झालें आणि जें त्यानें व्यक्त केलें, तें पुढें अक्षरशः खरें ठरलें, समाजाची हानि एवढी प्रचंड झाली कीं, तेव्हांचें आर्य लोकांचें राष्ट्र दुर्बळ होऊन गेलें. राजघराणीं तर शेंकड्यावारी नष्ट झालीं; आणि भोंवतालच्या रानटी लोकांचे हल्ले परतविण्याचें बळ समर्थांच्यासुद्धां अंगीं राहिल नाहीं.

—प्रा. श्री. म. माटे
( गीता-तत्त्व-विमर्श )

प्रा. पण्डित आवळीकर

# शांतलिंगकृत 'विवेकचिंतामणि'

लेखांक ३ रा

## शांतपरंपरा

शांतलिंगाच्या 'विवेक चिंतामणी' प्रमाणेंच त्याची परंपराहि अभ्यासण्यासारखी आहे.[1] स्वतः लिंगायत व शिष्य-प्रशिष्य मात्र ब्राह्मण. स्वतः मांडलें लिंगायतपंथाचें तत्त्वज्ञान. परंतु शिष्यांनीं त्याच तत्त्वज्ञानाचा प्रसार वा प्रचार पुढें केला असें नाहीं. यामुळें त्याची एक विशिष्ट परंपरा निर्माण झाली. तिलाच मी 'शांतपरंपरा' असें म्हणतों. हेंच नांव जयरामस्वामींनींहि 'शांतिपंचीकरण' ग्रंथांत दिलें आहे. त्यांतील अध्याय पस्तीसमध्यें शांत-परंपरेंतील कांहीं नांवें मिळतात.

प्रभुपंचमहासिद्धेश्वर ।
सांगूं तयाचा विस्तार ।
सदाशिव ईश्वर महेश्वर ।
महारुद्र चार मठीं ॥ १४ ॥
घंटाकारणें[2] शंखाकारण ।
काळांतक सर्वानुग्रहें[3] अलजर्णे[4] ।
महाकर्तृमूर्ति अनुग्रहेश्वर दोन ।
सर्वसाक्षी सर्वाचार्य पूर्ण हे बारा ॥१५॥
रेवणसिद्ध मराळसिद्ध[5] ।
येकोराम पंडिताराध्य ।
षोडश झाले पुढे भेद ।
ज्ञानी सावध परिसावें ॥ १६ ॥
धर्मेंद्र रुद्रमुनींद्र ।
मुक्तमुनी समाधिसोमेश्वर ।
विंशति झाले विस्तार ।
ऐक सादर सच्छिष्या ॥ १७ ॥
बनसदाशिव एकविसावा ।
चतुर्दशविद्यापारंगत बाविसावा ।
रेवणाचार्य मल्लिकार्जुन गणावा ।
चतुर्विंशतिपर्यंत ॥ १८ ॥
षडगदशीर्वे[6] बसवेश्वर भाळलोचन ।
धातुर्वादी अठ्ठावीस जाण ।
बदरीकांत चनमल्लिकार्जुन ।
गंगाधर एकतीस ॥ १९ ॥
सिंगळसिद्ध निराहारसिद्ध ।
समाधिसिकूं[7] शांतसोमेश्वर प्रसिद्ध ।
हुल्लिकांती चन्नवीर चलूरशांत वंद्य ।
विद्यापारंगत अडतीस हे ॥ २० ॥
शांतबोध शांतेश्वर ।
सुखबोध पूर्णबोध निर्धार ।
बसवलिंग शांतलिंग सधर्र[8] ।
दशरथशांत पन्नास हे ॥ २१ ॥

## परंपरा-निवेदनाची पार्श्वभूमि

गुरु-शिष्यसंवादाच्या रूपानें ही परंपरा येथें सांगितली गेली आहे.

...शांतमठांचा निर्णय । समन्वय निवडुनी सांगा ॥१॥
—असें शिष्यानें म्हटल्यावर गुरूनेंहि,
...हे शांतमठाची वित्पत्ती । सांगितली तुजप्रती ॥१०॥

---

१ पहा : 'शांतलिंगकृत विवेकचिंतामणि', ('नवभारत,' सप्टेंबर व ऑक्टोबर, १९५७).
२ घंटाकर्ण. ३ सर्वानुग्रहक. ४ अठजण, असें असावें. ५ मरळसिद्ध. ६ षडगदगी. ७ सिद्ध. ८ सदर ?



अनुक्रमणिका






आतां शांतपरंपरा गांठी ।
देऊं शेवटीं अवधारा ॥ १३ ॥
हें शांतपरंपरा वर्णन ।
समूळ कथिलें तुजलागून ॥ २२ ॥

असें म्हणून ' संशयग्रंथी छेदावया ' हा निवेदनाचा प्रपंच केला आहे.

ही परंपरा सर्वेश्वरांनीं शांतलिंगास सांगितली असाहि समज दिसतो. " माझें नांव नीलकंठ असून, ( आदिनाथापासून ) मी एकूणपन्नासावा व तूं पन्नासावा आहेस; " असें सर्वेश्वरांनीं शांतलिंगास सांगितलें. अशी माहिती श्री. खरशीकरशास्त्री देतात[९].

' शिवगुरुदर्शन ' असें या प्रसंगाला श्री. जोशी यांनीं नांव दिलें आहे. नीलकंठ हे शांतलिंगाचे गुरु. त्यांनींच दर्शन देऊन परंपरा सांगितली असें एकवेळ गृहीत धरलें तरी परंपरेंत नीलकंठ व शांतलिंग एकूणपन्नासावे आणि पन्नासावे येत नाहींत. तर ते अनुक्रमें एकुणचाळीसावे व चाळीसावे येतात.

जयरामस्वामींच्या म्हणून दिलेल्या ( खरशीकरांच्याच पुस्तकांतून घेतलेल्या ) ' शांतिपंचीकरणां'तील उताऱ्यांत विसाव्या ओवींत ' विद्यापारंगत अडतीस हे ' असा उल्लेख आहे. पुढें एकविसाव्या ओवींत ' शांतबोध, शांतेश्वर, सुखबोध, पूर्णबोध, बसवलिंग, शांतलिंग व दशरथ ' अशीं सात नांवें दिलीं आहेत. आणि मधलीं पांच नांवें गाळलीं गेलीं आहेत.[१०]

## हीं पांच नांवें कोणतीं ?

पांच महत्त्वाचीं नांवेंच येथें गाळलीं गेलीं आहेत, इकडे कोणाचेंच लक्ष गेलें नाहीं. नीलकंठ, शांतलिंग, कृष्णप्पा व जयरामस्वामी, हीं आपणांस माहीत असलेलीं चार नांवें नाहींत, स्वतःचें नांव जयरामस्वामी देणार नाहींत, असें मानल तरी स्वतःच्या गुरूचें, गुरूच्या गुरूचें ( म्हणजे शांतलिंगाचें) नांव द्यावयाचें ते विसरले असतील हें अशक्य आहे. त्याचप्रमाणें एकविसाव्या ओवींतील सात नांवें हीं जयरामस्वामींच्या नंतर झालेल्या पुरुषांचीं आहेत. जयरामस्वामी तीं नांवें कशीं देतात ? विद्यापारंगत-अखेर अडतीस, मधलीं न दिलेलीं चार आणि शेवटलीं सात अशीं मिळून एकूणपन्नासच नांवें होतात. आणखी एक नांव कोणतें ?

शांतपरंपरेंतील सर्व पुरुषांचीं नांवें देणारें एक अप्रसिद्ध प्रकरण पाहावयास मिळालें.[११] त्यामध्यें विद्यापारंगत ते शांतबोध यांच्यामधील सर्व नांवें दिलीं आहेत. शांतबोध ते दशरथशांत पर्यंतचीं नांवें सारखीच आहेत. ' शांतिपंचीकरणां'त नसलेलीं पांच नांवें सुखबोध देतो तीं अशीं:—

विद्यापारांगतशांत श्रेष्ठ । तयांचा शिष्य अतिवरिष्ट ।
प्रगटे काशीपति नीलकंठ । जो ब्रह्मनिष्ठ अवतारी ॥ ३२[१२] ॥
प्रभुनीलकंठ काशीपति । तयांचा शिष्य शांतमूर्ति ।
जो कां शांत अगाधस्थिती । भोगी पुरती अखंड ॥ ३३ ॥
तयांचे कृपादृष्टी आपण । प्रगटे कृष्णक्लेशहरण[१३] ।
क्लेशहरणाची कृपा पूर्ण । प्रगटे संपूर्ण जयरामस्वामी ३४ ॥
जयरामस्वामीचे दयेन । प्रभु प्रगटे निरंजन ।
जया नावडे जैभान । म्हणोनि विजन सेवित ॥ ३५ ॥
निरंजनस्वामीचा अवतार । प्रगटे शांतबोधेश्वर ॥ ३६ ॥

यावरून आपणांस माहीत नसलेलें ' निरंजन ' हें एकनांव कळतें.

---

९ ' कर्णहंस. ' ( पृ. १०–१२ ) न. स. जोशी खरशीकर. १० विसाव्या ओवींत अडतीस आणि एकविसाव्या ओवींत सात अशीं पंचेचाळीसच नांवें येथें आहेत.

११ सुखबोधकृत ' परंपरापुरुषआराधन. '

१२ शांतलिंग (' विवेकचिंतामणि ' व ' कर्णहस्तकी ' यांचा कर्ता ).

१३ कृष्णप्पा.











## नांवांची चर्चा

शांतपरंपरेचें स्वरूप आणि वेगळेंपण ध्यानीं घेण्याच्या दृष्टीनें ' शांत ' हें नांव तपासण्यासारखें आहे. ' शांत ' नांवामध्येंच हरिहरैक्याचा झरा अंतर्भागीं झुळझुळत आहे.[१४] हरिहर, रामेश्वर, रामलिंग, या जोडनांवांतली कल्पना 'शांत' या एकेरी नांवांतहि आहे. शांतपरंपरेचा उगम आदिनाथापासून असल्यामुळें तिच्यावर शैवमताची दाट छाया पडलेली दिसते.

शांतपरंपरेंतील पहिले बाराजण पौराणिक काळांतील आहेत. कृत, त्रेता व द्वापर या युगांत ते होऊन गेले असें मानलें जातें. शिवाच्या नांवाखेरीज दुसरें कांहीं ऐकूं येऊं नये म्हणून कानाला घंटा बांधणाऱ्या घंटाकर्णाची कथा सुप्रसिद्ध आहे.[१५]

ऐतिहासिक वाटणाऱ्या नांवांचा प्रारंभ मात्र रेवणसिद्ध, मराळसिद्ध, येकोराम आणि पंडिताराध्य यांच्यापासून होतो. लिंगायतांच्या पंचाचार्यांतील हे चौघे. विश्वाराध्य हें पांचवें नांव मात्र या परंपरेंत दिसत नाहीं. शांतलिंगसुद्धां ' विवेकचिंतामणीं'त हींच चार नांवें देतो.[१६] ' आचार्यादि चतुष्क अशा चौघांचाच निर्देश तो करतो.[१७]

या चौघांचे मठ अनुक्रमें कोलिपाकी, उज्जनी, केदार व श्रीशैल येथें आहेत. विश्वाराध्याचा मठ वाराणसींत. येथील उज्जनी म्हणजे उत्तरेंतील उज्जैनी नव्हे. बेळ्ळारी जिल्ह्यांत कोट्टुरजवळ तीन मैलावर ही वटक्षेत्र उज्जनी असून तिला आज ' उजनी ' म्हणूनच ओळखतात. याच मठाच्या परंपरेंतील शांतलिंग, असा समज आहे. असे ' चार मठ ' असले तरी ' एक संप्रदाय ' असल्याची जाणीव दिसते.[१८]

रेवणसिद्ध व मराळसिद्ध यांचीं नांवें मराठींतील संतमालिकांतहि येतात. ' रेवाणसिद्धेश्वर ' असें नांव जयरामसुत देतो. मराळसिद्धाचें नांव ' मैराळसिद्ध[१९], मरळसिद्धं, असें दिलेलें आढळतें. यावरून महाराष्ट्राला हीं नांवें परिचित होतीं, असें वाटतें. रेवणसिद्ध नांवाचा ज्ञानेश्वरकालीन सिद्ध नेवाशानजीक मर्मगिरीवर होता. रेवगी येथें याच नांवाचा, जातीचा जंगम राहात होता. 'परमरहस्य' नांवाचा

---

१४ ' शांत ' हें नांव विष्णु आणि शंकर या दोघांचेंहि आहेः—

संन्यासकृच्छमः शान्तो निष्ठाशान्तिः परायणः ।
शुभाङ्गः शान्तिदः स्रष्टा कुमुदः कुवलेशयः ॥ —( विष्णुसहस्रनाम ).
महेशः परमं ब्रह्म शान्तः सूक्ष्मः परात्परः ।
सर्वान्तरः सर्वसाक्षी चिन्मयस्तमसःपरः ॥ —( शिवसहस्रनाम ).

१५ शिवरामकृत ' शिवकथामृत ' ( १६-११ ).

१६ रेवणसिद्ध मराळसिद्ध । येकोराम पंडिताराध्य ।
आचार्य संप्रदाय शुद्ध । तयालागून ॥ २-७४२ ॥

१७ ' विवेकचिंतामणि, ' ( २-७५१ ).

१८ ' शांतिपंचीकरण ' ( ३५-२३ ).

१९ एकलिंग मैराळसिद्ध... ॥ ५१ ॥ ( उद्धवचिद्घन ).
नरहरी एकनाथ मैराळ... ॥ ३९ ॥ ( रंगनाथ निगडीकर ).
मुक्तेश्वर मैराळसिद्ध... ॥ १७ ॥ ( सिद्धचैतन्य ).

२० जयरामसुत.











ग्रंथ त्याच्या नांवावर आहे. त्याची समाधि रेणावी ( जि. सातारा ) येथें आहे. संतमालिकांतील उल्लेख यापैकीं नेमका कोणाचा हें सांगणें कठीण आहे. मरळसिद्ध हा मुक्तेश्वराचा (?) शिष्य असून त्याचा ' निरंजनभेदु ' नांवाचा दशदेहाचें विवरण करणारा ओवीबद्ध ग्रंथ असल्याची माहिती मिळते. परंतु शांतपरंपरेंतील हीं दोन नांवें आचार्य-द्वयांचींच आहेत.

पुढेंहि धर्मइंद्रापासून विद्यापारंगतापर्यंतचे सर्व पुरुष हे कर्नाटकांतील आहेत. ते नांवावरून तरी मला लिंगायतच वाटतात. समाधिसोमेश्वर आणि शांतसोमेश्वर या नांवाचा विचार करतां कन्नडमध्यें ' सोमेश्वर-शतक ' लिहिणारा कवि सोमेश्वर डोळयां-पुढें येतो. वीर सोमेश्वर ( स. १२३४ ते १२५४) हें नांव कर्नाटकाच्या इतिहासांत मिळालें तरी येथें निरुपयोगी आहे.

बनसदाशिवऐवजीं चनसदाशिव अधिक अन्वर्थक वाटतें. चन्न म्हणजे सुंदर. पुढेंहि मल्लिकार्जुन, चनमल्लिकार्जुन अशीं नांवें येतात. मल्लिकार्जुन म्हटल्यावर श्रीशैलाचें व अक्कमहादेवीचें स्मरण होतें. शांतपरंपरेंतील पहिल्या मल्लिकार्जुनाला ' बोळ ' असें म्हटलेलें आढळलें. बोळ, म्हणजे मुंडन केलेला. ( केशहीन मस्तकाचा ). मल्लिकार्जुन नांवाचा एक कन्नड ग्रंथकार होऊन गेला. ( स. १२४५ ). ' शब्दमणिदर्पण ' कार काशीराजाचा हा पिता. त्यानें ' काव्यसार ' नांवाचा ग्रंथ लिहिला आहे.[२१] मल्लिकार्जुन हें नांव सिद्धचैतन्यकृत संतमालिकेंतहि आढळतें[२२]; पण यावरून विशेष बोध होत नाहीं.

षडगदशीव हाहि अशुद्ध शब्द आहे. षडगदगी-स्थापनाचार्य असें नांव तेथें हवें. गदगी म्हणजे गादी, किंवा पीठ. सहा पीठांची स्थापना करणारा म्हणूनहि कोणी प्रसिद्ध नाहीं. यानंतर आढळणारें बसवेश्वर हें नांव ' षट्स्थल'कार बसवेश्वरांचें नव्हे. कारण त्यांचा गुरु कूडलसंगमेश आहे. कोणी षडगदगी स्थापनाचार्य नाहीं.

बदरीकांत आणि हुल्लिकांती चन्नवीर हीं नांवें मजेशीर आहेत. येथें कांतऐवजीं कंति ( म्हणजे कंथा–कन्नड. ) असा शब्द हवा. बदरी ( बोर ), बगरी ( भोंवरा ) किंवा पगडी[२३] ( सोंगटें ) यांच्या म्हणजे लिंगाच्या आकृति असलेली ( सचित्र ) कंथा पांघरणारा असा पहिल्या नांवाचा अर्थ. हुल्लिकंति[२४] शब्दहि असाच. गंगाधर हें नांवहि विचार करण्यासारखें आहे. यालाच ' चरंती ' गंगाधर म्हटलें आहे. चरंती म्हणजे फिरणारा, जंगम. हुबळीला मूरसाविरमठ आहे. तेथील गादीला ' जगद्गुरू गंगाधरपीठ ' असें म्हणतात. त्या पीठाचे चौदा पुरुष झाले.[२५] शांतपरंपरेशीं त्या गंगाधरांचा कांहीं संबंध असावा. दुसरा कोणी गंगाधर प्रसिद्ध नाहीं.

---

२१ ' मध्ययुगीन चरित्रकोश ', ( पृ. ६०६ ).

२२ मल्लकार्जुन ब्रह्मचारी । प्रत्यक्ष वेद जैसे चारी ।
काये सांगू त्याचि थोरी । जन्मवरी गुरुसेवा ॥ १८ ॥

२३ ' पदडीकांति ' असेंहि नांव आढळतें. ' पदडी'ला अर्थ नाहीं. म्हणून शब्द ' पगडी ' असा असावा.

२४ हुल्लि=व्याघ्र; हुल्लू=तृणविशेष; हुल्ले=हरीण, मृग. व्याघ्रांबर, मृगाजिन इ. कंथा म्हणून पांघरणारा, असा अर्थ.

२५ पहिलीं चार नांवें गुरुसिद्ध, सिद्धलिंग, गुरुसिद्ध व गंगाधर अशीं आढळतात. पुढें गुरुसिद्ध व गंगाधर हींच दोन नांवें आलटून पालटून येतात.

चलूरशांत[२६] या नांवांतील ' चलूर ' हा शब्द ग्रामवाचकहि असूं शकेल. किंवा ' चन्न ' प्रमाणेंच ' चलुव ' म्हणजे सुंदर अशा अर्थी वापरला गेला असेल. एकनाथांचा म्हणून इकडल्या भागांत एक कन्नड अभंग म्हणतात. त्यांत प्रारंभींच अशा अर्थी शब्दप्रयोग आहे. 'चलुवने चलुवने पंढरिराया.' तेव्हां 'चलूर'च्या ठिकाणीं ' चलुव ' असेंहि असूं शकेल. विद्यापारंगत, चतुर्दशविद्यापारंगत हीं नांवें नुसतीं विशेषणें आहेत. त्या मानानें धातुर्वादी, सिंगळसिद्ध व निराहारसिद्ध[२७] या नांवांचा मागोवा घेणें श्रेयस्कर ठरेल. पहिल्या अडतीस पुरुषांची ही कथा.

शांतलिंगाचे गुरु नीलकंठ यांचा उल्लेख 'काशीपति ' असा आढळला तरी त्यावरून फारसा बोध होण्यासारखा नाहीं. श्री. ना. रा. बामणगांवकर म्हणतात, " ब्रह्मसूत्रावर क्रियासारनामक भाष्य नीळकंठ शिवाचार्य यांनीं लिहिलेलें प्रसिद्ध आहे. ह्याचे गुरु व वडील यांचें नांव मल्लयदेव असून आईचें नांव चन्नमांबा असें ग्रंथकारांनीं प्रारंभींच निवेदन केलें आहे. पण गांव कोणतें व शतक कोणतें एवढा बोध होत नाहीं. "[२८]

नीलकंठ हे शांतलिंगाचे गुरु असल्यानें आणि शांतलिंगाचा काल आपणांस माहीत असल्यानें शतकाचा बोध होणें आतां अवघड नाहीं. 'क्रियासार'कर्ते हे शांतलिंगाचे गुरु असावेत असें मानावयास सबळ पुरावा नाहीं. तें एक अनुमान आहे.

असेंच आणखी एक अनुमान मी केलें आहे. मुधोळजवळ शिरोळ नांवाचें गांव आहे. तेथें नीळकंठ आचार्यांचा मठ आहे. ' त्रिळेजाड ' जमातीचे ते गुरु मानले जातात.[२९] शिरोळचे नीलकंठ आचार्य हे शांतलिंगाचे गुरु असावेत. याबाबत निर्णायक विधान करणें कठीण आहे.

शांतलिंग, कृष्णप्पा व जयरामस्वामी हे प्रसिद्धच आहेत. संतमालिकांतहि त्यांनां स्थान मिळालेलें दिसतें.[३०] नीलकंठाचें नांवहि एका ठिकाणीं आलें आहे.[३१] निरंजन हें नांव मात्र, जयरामस्वामींचे शिष्य म्हणून, अन्यत्र आढळत नाहीं.

त्याचप्रमाणें[३२] शांतबोध हे कोठें होऊन गेले, ही माहितीहि उपलब्ध नाहीं. शांतेश्वर हे ' ढपळापुरीं '[३३] व सुखबोध हे ' सांवगांवीं ' होऊन गेले असा उल्लेख आढळतो.[३४] त्याचप्रमाणें सुखबोध, पूर्णबोध व बसवलिंग हे तिघे गुरुबंधु होते; अशीहि माहिती मिळते.

यापैकीं बसवलिंगाचा कवि म्हणून ' महाराष्ट्र सारस्वतां'त भाव्यांनीं उल्लेख केला आहे. ( पृ. ५३६–३७ ). त्याच्या नांवावर भामाविलास, उमामहेशसंवाद, व गजगौरीव्रत आख्यान हीं प्रकरणें आहेत. त्यापैकीं शेवटचें राघव व बसवलिंग यांनीं मिळून लिहिलें आहे. त्याचा काल, भावे,

---

२६ चल्लूर शांतेश्वर.

२७ निराहारि.

२८ ' कर्णहंस ' ( पृ. १४ ).

२९ ' क्रियासार ' कर्ते व शिरोळचे नीळकंठ या दोन भिन्न व्यक्ति नसण्याचाहि संभव आहे.

३० शांतलिंग श्रीकृष्णयोगिया कृष्णदास जयराम ( जयरामसुत ).

३१ नीलकंठ शांतलिंग । जयराम श्रीकृष्णअभंग ।
गोपाळस्वामी निःसंग । गुरुभक्त साम्य सर्वस्वें ॥ ४४ ॥ ( रंगनाथ ).

३२ शांतबोधेश्वर.

३३ डफळापूर.

३४ सुखबोधकृत ' परंपरापुरुषआराधन '.








श. १६०० चा सुमार असा देतात. उद्धवचिद्घनानें त्याचें नांव संतमालिकेंत घातलें आहे. याचा अर्थ तो उद्धवचिद्घनापूर्वी होऊन गेला किंवा समकालीन होता. उद्धवचिद्घन श. १६११ नंतर केंव्हांतरी झाला असें मानलें जातें. माझ्या समजुतीप्रमाणें त्याचा आणि म्हणून बसवलिंगाचा काळ श. १७०० चा सुमार मानावा.

जयरामस्वामींचा निर्वाण शक १५९७. त्यानंतर निरंजन, शांतबोध व शांतेश्वर होऊन गेले. सुखबोध व पूर्णबोध हे बसवलिंगाचे गुरुबंधु होते असें गृहीत धरलें तरी वरील तिघे होऊन जाण्यास १७ व्या शतकाचा अर्ध तरी उलटला असावा.

या बसवलिंगाच्या शिष्याचें नांव पुन्हां शांतलिंग. हा ‘ संकेश्वरीं ’ होता. आणि जातीनें सारस्वत ब्राह्मण होता. याचा मुलगा दशरथशांत; शांतपरंपरेंतील पन्नासावा पुरुष. याचा पुत्र दत्तात्रयशांत. याच्याच सुखबोध नांवाच्या शिष्यानें शांतपरंपरा सांगणारें प्रकरण लिहिलें आहे. आजहि संकेश्वरला ‘ शांत ’ आडनांवाचें घराणें आहे.

**शांतलिंग हा आद्यशांतेश्वर–**

शांतलिंगापूर्वी दोन ‘ शांत ’ होऊन गेले असले तरी त्याच्या आधींच्या पुरुषांनीं मराठींत रचना केलेली नाहीं. म्हणून मराठी कवींतली शांतपरंपरा शांतलिंगापासूनच सुरू होते. ‘ आद्यशांतेश्वर प्रसिद्ध सकळां ’ असें त्याचें वर्णन यामुळेंच करण्यांत आलें असावें.

‘ शांत ’ हें नांव शांतपरंपरेला व शांतलिंगाला कां अन्वर्थक ठरतें, तें पुढील उल्लेखांवरून कळेल. शांतलिंगाचें वर्णन सुखबोध असें करतो,

प्रभु नीलकंठ काशीपति ।
तयांचा शिष्य शांतमूर्ति ।
जो कां शांत अगाधस्थिती ।
भोगी पुरती अखंड ॥ ३३ ॥

‘ शांत ’ या नांवांत या स्थितीची किंवा अवस्थेची कल्पना आहे. शांतलिंगानें या ‘ शांती’वर दिलेला भर पाहण्यासारखा आहे:–

चैतन्यं शाश्वतं शांतं व्योमातीतं निरंजनं ।[35]
नादबिंदुकलातीतं तस्मै श्री गुरवे नमः ॥२-१॥

निवृत्तिकळा प्रतिष्ठाकळा ।
विद्याकळा शांतिकळा ।
शांत्यातीतकळा स्थितिकळा ।
ह्मणिजे कळाषडविध ॥ २-८४८ ॥

निवृत्ती प्रतिष्ठा विद्याशांति ।
शांत्यातीत पवित्रांगति ॥ ८-४२ ॥

भोगमोक्षादि अनेक सुखशांती ।
जे येकाग्र ऐकोनी जाणती ।
तयासी सर्वथां होय प्राप्ती ।
ह्मणोनी आशिर्वाद ॥ १०-१३८ ॥

ऐकत्या पढत्या जना ।
स्वयं होय प्राज्ञा ।
विघ्न निरसोनिया मना ।
शांति हातावसे[36] ॥ ३७६ ॥

**शांतपरंपरेचें तत्त्वज्ञान**

शांतपरंपरेचें तत्त्वज्ञान खास वेगळें असें नाहीं. शांतलिंगापर्यंत केवळ ‘ लिंगायत संप्रदाय ’ एवढेंच तिचें स्वरूप दिसतें. सिद्ध, अवधूत या पंथांच्या छटाहि आधींच्या नांवांत दिसतात.

शांतलिंगानें लिंगायत तत्त्वज्ञान सांगितलें, पण आपला पंथच तेवढा श्रेष्ठ अशी त्याची संकुचित दृष्टि नव्हती. त्यामुळें त्याच्या परंपरेंत ब्राह्मणांचा, शैवेतरांचाहि अंतर्भाव होऊं शकला. हें समन्वयाचें तत्त्वज्ञान शांतपरंपरेनें आचरलें असें आढळतें.

शांतलिंगावर तत्कालीन महाराष्ट्रीय संतांचाहि

३५ ‘ विवेकचिंतामणि ’.
३६ ‘ कर्णहंस ’.

परिणाम झाल्याशिवाय राहिला नाहीं. लिंगायत पंथांत भक्ति आहेच. परंतु त्यावेळीं महाराष्ट्रांत भक्तीचा सागरच उचंबळला होता. या भक्तीला जातिभेद माहीत नव्हते आणि तिचें दैवत 'विठ्ठल' किंवा 'श्रीकृष्ण' हें होतें.

महाराष्ट्रांतील या भागवतपरंपरेला विरोध झाला असणें स्वाभाविक आहे. शांतलिंगानें कृष्णप्पा-सारख्या ब्राह्मणाला व कृष्णभक्ताला शिष्य करून अशा विरोधाला सक्रिय उत्तर दिलें. शांतलिंग व कृष्णप्पा यांनीं तीर्थयात्रा केली तेव्हां ते मथुरेलाहि गेले होते. वृंदावनांत त्याच्या गुरूनें त्याला गुप्तपणें चाललेली रासक्रीडा दाखविली; असें म्हणतात. भक्तीला माणसांप्रमाणेंच हरि-हरांतहि भेद करतां येत नाहीं; असें शांतपरंपरेनें सिद्ध केलें. शांत-लिंगानें वेदांबद्दलहि दाखविलेला आदर याच वृत्तीचा द्योतक आहे. त्याचप्रमाणें 'येकनाथा' बद्दलहि त्यानें आत्मीयतेचा उद्गार काढला आहे.[३७] यावरून तो एकनाथानंतर कांहीं काळ हयात होता यालाहि दुजोरा मिळतो.

एकनाथांचे गुरु जनार्दनस्वामींची व शांतलिंगाची भेट झाली होती; अशीहि माहिती मिळते[३८]. त्यावरून शांतलिंग हरि–हरांच्या व हरि–हरभक्तांच्या एकी-करणाचा कसा प्रयत्न करीत होता; हें स्पष्ट व्हावें. शांतलिंगाचा 'शंभूमहादेव'[३९] देखील याच ऐक्याचें प्रतीक आहे. त्यामुळें शांतलिंगाच्या शांत-परंपरेला 'अविभक्तं विभक्तेषु' या स्वरूपाची तत्त्वज्ञानात्मक बैठक लाभणें स्वाभाविक होतें.

शांतलिंगाला 'प्रेमजिव्हाळा' असें म्हटलें आहे. तो आपल्या गुरूला 'प्रेमपददायकु' असें संबोधितो. शांतपरंपरेंतील भक्तीचाच हा निर्देश आहे. ही भक्ति गुरूबद्दल, म्हणजेच परमेश्वराबद्दल आहे. गुरु हाच परमेश्वर. तोच 'अज्ञान तम फेडिता दिनकरू', 'भवाग्नी निववितां जलधरू', 'तत्त्वभ्रमविध्वंसकु' असा आहे.[४०] आणि त्याच्या-मुळें 'ज्ञानेज्ञानपणा मुकोनि शांति' मिळते. मनाची अशी 'शांत' अवस्था हेंच या परंपरेचें उद्दिष्ट दिसतें. 'जिवाशिवाची जडली समाधी' ही स्थिति म्हणजेच शांतस्थिति.

### शांतपरंपरेचें वाङ्मय

शांतलिंगाचे दोन ग्रंथ ('कर्णहंसकी' व 'विवेकचिंतामणि') आतां उपलब्ध झाले आहेत. अजूनहि कांहीं सांपडणें शक्य आहे. कृष्णप्पाचीं पदें असल्याचा उल्लेख आहे. परंतु त्यांचें संकलन झालेलें नाहीं. जयरामस्वामींच्या ग्रंथांबाबत आप-णांस बरीच माहिती आहे. परंतु 'शांतिपंचीकरणा' सारख्या प्रकरणांबाबत शंका आहे.

शांतपरंपरा देणाऱ्या ओव्यांवरून मला असें वाटतें कीं, त्या ओव्यांपैकीं वीस आणि एकवीस

---

३७ कृतार्थ जाहलासि ऐसे वदोन । सांगितलें पुढील कारण ।
येकनाथ पुन्हां जन्मले जाण । उपदेश करणें तयासी ॥ १२–५५ ॥
– ('भक्तमंजरीमाला' राजाराम).

३८ "दौलताबाद येथें श्रीजनार्दनस्वामींची भेट झाली." ('कर्णहंस', पृ. १२).

३९ 'शंभू महादेव', शिखर शिंगणापूर येथील देवस्थान. तेथें जोड शिवलिंगें असून एकावर तुळस व दुसऱ्यावर बेल वाहतात.

४० तूं भवाग्नी निवविता जलधरू । कीं अज्ञान-तम फेडिता दिनकरू ।
संसारसमुद्रीं तारिता ईश्वरू । ब्रह्मांडनायका ॥ २ ॥
तूं विद्याऽविद्यात्रासकु । तत्त्वभ्रमविध्वंसकु ।
प्रेमपददायकु । ऐसीं ब्रीदें तुझीं ॥ ३ ॥ ('कर्णहंस').








मधली एक ओवी निश्चितपणें गळली आहे. आणि ' शांतिपंचीकरण ' हें जयरामस्वामींचेंच मानावयाचें झालें तर, एकविसावी ओवी ही कोणीतरी नंतर घुसडली आहे.

' शांतिपंचीकरणा 'चा कर्ता दुसराच कोणी तरी असावा आणि तो दशरथशांतानंतरचा असावा. हें प्रकरण भाव्यांनीं जयरामस्वामींचें म्हणून दिलें असलें तरी डॉ. तुळपुळे मात्र ' पुरवणींत ' ( पृ. ९७१ ) त्याचा उल्लेख करत नाहींत. हा विचार करण्यासारखा प्रश्न आहे.

निरंजनापासून पुढील सर्वांची माहिती व वाङ्मय यांचा शोध घेणें आवश्यक आहे. यापैकीं दशरथ-शांताची किंवा त्याच्याविषयींची कांहीं रचना प्रकाशांत येऊं पहात आहे. शांतलिंगाच्या शांतपरंपरेचा विचार संशोधनाला चालना देणारा आहे. या संशोधनांतून आणखी कांहीं कवींची, ग्रंथांची भर मराठी वाङ्मयांत पडण्याचा संभव आहे. या परंपरेंत लिंगायत पंथाचा प्रवाह वहात असल्यानें त्याचें मराठींतील स्वरूप अधिक स्पष्ट करणारें कांहीं तरी हातीं येण्याची शक्यता आहे.

---

## सामाजिक कर्तव्यनिष्ठेचा सिद्धान्त

ज्ञान किंवा भक्ति हा कृष्णाचा मुख्य संदेश धरला, तर गीतेचें तोंड परमार्थाकडेच वळलेलें आहे असें म्हणावें लागेल. पण कर्तव्यपालन हा तिचा संदेश आहे असें म्हटलें, तर गीतेचें तोंड समाजाकडे वळलें आहे असें म्हणणें प्राप्त आहे; आणि टिळकांनीं गीतेंतील संदेशाचें आयुर्मान मानवी समाजाच्या आयुर्मानाइतकेंच सुदीर्घ बनवून ठेवलें आहे, हें त्यांच्या ग्रंथाचें खरें वैभव होय. मानवयोनि जितके दिवस जिवंत राहील, तितके दिवस विहित आणि प्राप्त कर्तव्याचा उपदेश करीत राहणें आवश्यक आहे. कारण कर्तव्यांतून अंग काढून घेणें हा माणसाच्या मनाचा एक चोरटा धर्म आहे. हा धर्म नष्ट करून माणसाला कर्तव्याच्या मार्गावर स्थिर करणें, ही सामाजिक सुशिक्षा कोणीतरी दिलीच पाहिजे; आणि तें काम गीतेनें बजावलें आहे, असा टिळकांचा आग्रह आहे.

ज्ञान किंवा भक्ति हें गीतेचें मुख्य प्रतिपादन आहे असें आपण मानलें, तर मात्र कर्मविपाक आणि पुनर्जन्म हीं त्यांत मानावींच लागतील. कारण त्याशिवाय मोक्षाची कल्पना सिद्ध होत नाहीं. परंतु गीतेचें मुख या परमार्थविचाराकडून मानवाच्या सामाजिक ध्येयाकडे वळलें, तर कर्मविपाक, पुनर्जन्म व वर सांगितलेल्या आणखी तीन कल्पना या मानण्याची आवश्यकता शिल्लक उरतच नाहीं. त्यांच्या साहाय्याशिवायहि सामाजिक कर्तव्यनिष्ठेचा मुख्य सिद्धान्त आत्मसामर्थ्यानें ठाम उभा राहूं शकतो. जर कां कोणी असें प्रतिपादन केलें कीं, सामाजिक कर्तव्यनिष्ठेच्या सिद्धान्ताच्या बळकटीला बाकीच्या कल्पना आवश्यक आहेत; त्या नसल्या तर हा सिद्धान्तच उभा राहूं शकणार नाहीं; तर मग या बाकीच्या कल्पना तर्कानें सिद्ध होत नाहींत किंवा निदान विवाद्य रहातात, असें जर का दिसून आलें, तर कर्तव्यनिष्ठेचा मुख्य सिद्धान्त डळमळूं लागेल ! या बाकीच्या कल्पना त्याला पुष्टि देण्यासाठीं किंवा त्याचें संरक्षण करण्यासाठीं त्याच्या शेजारीं उभ्या असोत किंवा नसोत, सामाजिक कर्तव्यनिष्ठेचा सिद्धान्त आत्मबलानें खडा राहीलच राहील. माणसाला मोक्ष मिळो वा न मिळो, कर्मविपाक, पुनर्जन्म, अवतार इत्यादि त्याला मान्य असोत वा नसोत, टिळकांनीं सांगितल्याप्रमाणें तो जर सामाजिक कर्तव्याची निष्ठा बाळगत असेल, तर श्रीकृष्णानें सांगितलेला हा संदेश त्याच्या अंगीं पुरा पुरा बाणलेला आहे असें मानावयास कांहींच हरकत नाहीं.

—प्रा. श्री. म. माटे
( गीता-तत्त्व-विमर्श )





अनुक्रमणिका

श्री. शं. वा. हर्डीकर

# भारतांतील विज्ञानसंवर्धन

आपल्या देशांत विज्ञानाच्या वाढीस प्रोत्साहन दिलें जावें अशी इच्छा सामान्यतः आहे. त्याचप्रमाणें आपल्या राष्ट्रीय जीवनांत इंग्रजी भाषेचें स्थान काय असावें याविषयीं तीव्र मतभेदहि आहेत. देशी भाषांच्या उपयोगाचा आग्रह धरणाऱ्या – किंबहुना यांस इंग्रजी-विरोधक म्हणणें जास्त सयुक्तिक होईल–कांहीं जणांची मजल येथवर जाते कीं, इंग्रजीस पूर्णपणें खो द्यावा. इतरांच्या मतें जेथें अपरिहार्य असेल तेथेंच इंग्रजीचा उपयोग करावा. परंतु अपरिहार्यतेचें क्षेत्र व त्याच्या मर्यादा, आणि त्यांत वापरण्यासाठीं तरी इंग्रजी भाषेचें ज्ञान किती असावें, व तें मिळविण्यासाठीं वेळ व श्रम किती खर्च करणें योग्य होईल, शाळा-कॉलेजांच्या अभ्यासक्रमांत काय योजना असावी, याबाबतहि पुष्कळच मतभेद आहेत.

'नवभारत'च्या जुलै १९५७ च्या अंकांत श्री. वऱ्हाडपांडे यांचा "इंग्रजी व संस्कृत" हा लेख प्रसिद्ध झाला आहे. त्यांत त्यांनीं स्थूल घटना व तात्त्विक कल्पना यांचें अचूक यथातथ्य, वर्णन तसेंच नवीन सत्यें व कल्पना वर्णन करण्यासाठीं नवीन शब्द पुरविण्याची क्षमता या दृष्टींनीं तुलना करून संस्कृत भाषेचें श्रेष्ठत्व व ग्राह्यत्व प्रतिपादन केलें आहे. श्री. वऱ्हाडपांडे यांचें मत शिक्षणतज्ज्ञांस–सर्वानुमतें, निदान बहुसंख्येनें–मान्य होईल किंवा नाहीं याचा प्रस्तुत लेखकास अजमासहि नाहीं, परंतु तें तत्त्वत: मान्य आहे असें गृहीत धरून पुढील मजकूर लिहिला आहे.

## देशी भाषांचें दौर्बल्य

श्री. वऱ्हाडपांडे यांच्या लेखाच्या सुरुवातीस दिलेल्या तऱ्हेनें बोलण्यांत[1] एकें काळीं कांहीं हिन्दुस्थानीयांस अभिमान व प्रौढी वाटत असण्याचा संभव आहे. तो काळ गेला असें समजण्यास हरकत नाहीं. तरी मला वाटतें आज बरेच लोक असे सांपडतील कीं भौतिक शास्त्रांतील सिद्धान्त किंवा प्रत्यक्ष घटनांचें वर्णन करणें झाल्यास आपल्याला तें देशी (उदाहरणार्थ, मराठी) भाषेपेक्षां इंग्रजींत जास्त स्पष्ट व सुबोधपणें करितां येईल असें त्यांना कबूल करावें लागेल. पाहिजे तर असें म्हणावें कीं, इंग्रजी ही कांहीं झालें तरी परकीय भाषा असल्यामुळें बहुतेकांना तिच्यांतहि आपले विचार चांगल्या प्रकारें मांडतां येत नाहींत; हें खरें असलें तरी दुर्दैवानें विरोधाभास दिसला तरी हें त्याहूनहि सत्य आहे कीं मातृभाषेंतून विचार व्यक्त करण्याची शक्ति त्याहूनहि कमी आहे!

याचें कारण प्रा. वऱ्हाडपांडे यांनीं वर्णन केल्याप्रमाणें हें आहे कीं, इंग्रजी भाषेच्या अभ्यासावर व इंग्रजी माध्यमांतून इतर विषयांचा अभ्यास करण्यांत तसेंच इंग्रजी वर्तमानपत्रें, नियतकालिकें वगैरे वाचण्यांत आपला जितका वेळ खर्च होतो त्यापेक्षां पुष्कळच वेळ मातृभाषेच्या अभ्यासांत (व संग-

---

१ "माझे विचार व्यक्त करायला मराठी भाषा फार तोटकी पडते. मराठींत शब्दसंपत्ति फार कमी. शिवाय मराठी भाषा मिळमिळीत वाटते. जें वाक्य इंग्रजींत एकदम परिणामकारक वाटतें तें मराठींत अगदींच फिकें वाटतें ..." 'इंग्रजी व संस्कृत'- प्रा. नी. र. वऱ्हाडपांडे 'नवभारत' जुलै १९५७. पृष्ठ ४४.



अनुक्रमणिका






त्तींत देखील ) व दिलाच तर त्यापेक्षांहि कमी, जी आपल्या भाषांचें मूळ व शब्दसंपत्ति पुरविणारी त्या classical संस्कृतभाषेच्या अभ्यासांत खर्च होतो. या विवेचनामुळें वस्तुस्थितीच्या कारणाचा उलगडा झाला तरी तिच्यांत याक्षणीं फरक होत नाहीं!

## विज्ञानाचा प्रसार म्हणजे काय ?

सद्य:कालीन भौतिक शास्त्रांच्या ज्ञानाचा प्रसार करण्याविषयीं जेव्हां आपण बोलतों तेव्हां आपलें उद्दिष्ट काय असतें अथवा असावयास पाहिजे या-विषयींची आपली कल्पना स्पष्ट झालेली असणें बरें. (१) प्रत्यक्ष, जिवंत, शास्त्रीयज्ञान आत्मसात् करण्याचा आहे कीं (२) दुसऱ्यांनीं निरीक्षण करून इतर भाषांत वर्णिलेल्या घटना अथवा मांडलेल्या उपपत्ति आपल्या भाषेंत शब्दास प्रतिशब्द ठेवून वर्णन करण्याची सोय करून आपणांस विषयाचें सत्य आकलन झालें असें ( काल्पनिक ) समाधान करून घेण्याचा आहे ? पहिला साध्य केल्यास पूर्वी मिळविलेल्या ज्ञानांत स्वप्रयत्नानें वाढ करितां येईल. आणि एकंदर ज्ञानाच्या क्षेत्रांत स्वतः केलेल्या संशोधनानें कधीं काळीं तरी भर घालतां येईल. दुसऱ्याची मर्यादा स्वभावत:च ‘ शाब्दिक भाषांतर ’ ही राहील, आणि त्या योगानें होणारी ‘ प्रगति ’ पूर्वपचित ( predigested ) अन्नसेवन करणाऱ्या किंवा स्वत:चे पाय निरुपयोगी असल्यामुळें कुबड्या वापरणाऱ्या किंवा दुसऱ्याच्या खांद्यावर बसून फिरणाऱ्याच्या स्वरूपाची होईल.

भौतिक शास्त्रांचा व्यवहार नैसर्गिक घटना अथवा नियंत्रित परिस्थितींत केलेल्या प्रयोगांच्या, निरीक्षण, वर्णन व त्यांवरून काढलेल्या सिद्धांतांशीं असतो. त्यांचें ज्ञान स्थिर ( static ) नाहीं. सतत नवीन घटना निरीक्षिल्या आणि वर्णिल्या जात असतात. सिद्धांत देखील बदलतात. प्रकाशित झालेलीं पुस्तकें अल्पकाळांत जुनीं पुराणीं होतात. खऱ्या ज्ञानार्जनासाठीं प्रत्यक्ष वस्तु हाताळणें आणि घडणाऱ्या क्रियांचें निरीक्षण हें काय आहे किंवा घडत आहे याच्या शाब्दिक वर्णनापेक्षां अत्यंत अधिक महत्त्वाचें आहे. दुसऱ्या शब्दांत सांगावयाचें झाल्यास, शब्द आणि पारिभाषिक शब्द यांचें स्थान घटनांच्या प्रत्यक्ष परिचयाचा तुलनेनें गौण आहे. भाषा आणि परिभाषा या निरीक्षिलेल्या गोष्टींच्या वर्णनास आवश्यक आहेत, परंतु शाब्दिक वर्णन प्रत्यक्ष निरीक्षणाची जागा कदापि घेऊं शकत नाहीं.

## पारिभाषिक शब्दांचें स्वरूप

पारिभाषिक शब्दांविषयीं असें म्हणतां येईल कीं, एकादा नवीन पारिभाषिक शब्द बनविणारा मनुष्य ज्या पुराणभाषेंतील ( उदा. ग्रीक, लॅटिन वा संस्कृत ) धातूपासून तो शब्द उत्पादील त्या धात्वर्थानें वर्ण्य वस्तूच्या एकाद्या गुणाचा बोध होईल, परंतु भौतिक शास्त्रांच्या बहुसंख्य विद्यार्थ्यांस पारिभाषिक संज्ञांच्या धात्वर्थाची माहिती नसते. परिणामतः त्यांच्या दृष्टीनें या संज्ञा बीजगणितांतील अशा चिन्हांप्रमाणेंच असतात, कीं ज्यांना स्वत:सिद्ध कांहीं अर्थ अथवा किंमत नसून संकेतानें ठरविलेलीच किंमत असते. अर्थात् पारिभाषिक शब्दाची व्युत्पत्ति माहीत असल्यास वर्ण्य वस्तूचा विशिष्ट गुण, किंवा तिच्या शोधाचा इतिहास, किंवा कधीं काळीं तिच्या स्वरूपाविषयींची कल्पना इत्यादिकांवर प्रकाश पडतो, व मानसिक व्यापारांमधील साहचर्यामुळें आकलनसुलभ होण्यास व आठवण राहण्यास मदत होते हें मान्य करण्यास हरकत नाहीं. परंतु तो शब्द वापरणाऱ्या विद्यार्थ्यांस ही माहिती अगदीं आवश्यक आहे असें म्हणतां येत नाहीं. उदाहरणार्थ, Malaria चा शब्दार्थ Bad air असा आहे, व त्याच्या जंतूंचा शोध अलीकडील काळांत लागला, परंतु दीर्घ कालापासून दलदलीच्या ठिकाणांशीं याचा निकट संबंध असल्याचें माहीत होतें; व अशा ठिकाणीं सायंकाळीं जमिनीजवळ



अनुक्रमणिका






धुकें पडतें व त्याबरोबर कांहीं विषारी वायू असून त्यापासून हिंवतापाचा उपद्रव होतो अशी कल्पना असल्यामुळें तें नांव देण्यांत आलें—अशाच ठिकाणीं त्याचा प्रसार करणारे डांस असतात व ते रोगाचे जंतु एकापासून दुसऱ्यास पोहोंचवितात, ही माहिती अलीकडील आहे. जंतूंचा शोध लागला तरी जुनें नांव कायम आहे. परंतु विद्यार्थ्यास ' मलेरिआ ' शब्दाची व्युत्पत्ति माहीत नसल्यास त्याचें कांहीं अडत नाहीं.

वरील विवेचनावरून दिसून येईल कीं, शास्त्रीय अभ्यासाकरितां संस्कृतोद्भव शब्द तयार करण्याची आवश्यकता कांहीं वेळां मानण्यांत येते तितक्या निकडीची नाहीं. ' संस्कृत ' पासून केलेले शब्द सहज समजण्यांत येण्यासारखे असतील तर फार उपयुक्त होतील हें नाकारण्याचा उद्देश नाहीं; परंतु केवळ भाषा-कोविदांनीं बनविलेले अतिशय कृत्रिम शब्द निरुपयोगी ठरतील हें निश्चित.

आपल्या देशांत आधीं शास्त्रज्ञ थोडे आहेत; त्यांतून संस्कृत भाषेंत पारंगत आणखीहि कमी. परिभाषा तयार करण्यांत संबंधित शास्त्रज्ञ आणि भाषापंडित या दोघांचें सहकार्य आवश्यक आहे.

सध्यां शिक्षण-क्षेत्रांत अतिशय गोंधळ माजलेला आहे. शिक्षणाचा दर्जा खालावला आहे. मातृभाषेच्या माध्यमाद्वारें शिकलेल्यांचें देखील, – इतर विषयांची गोष्ट राहो—मातृभाषेचेंहि ज्ञान समाधानकारक नसतें ही वस्तुस्थिति आहे. तथापि हा विषय स्वतंत्र असल्यानें तूर्त याविषयीं जास्त लिहीत नाहीं.

### मराठींतील ग्रंथरचना

शास्त्रीय विषयांवर वैयक्तिक रीत्या आजवर बऱ्याच लोकांनीं मराठींत पुस्तकें लिहून प्रकाशित केलीं आहेत. त्यांविषयीं असें म्हणतां येईल कीं, ( Technical Scientific ) शास्त्रीय व तंत्रविद्येच्या माहितीच्या जास्त तपशिलांत शिरल्यास सामान्य वाचकाच्या सहज आकलनशक्तीच्या बाहेर गेल्यामुळें त्याची तीं वाचण्याकडे प्रवृत्ति होत नाहीं; आणि त्या विषयाचा शास्त्रीय धंदेवाईक दृष्ट्या अभ्यास करणाऱ्याच्या दृष्टीनें ही माहिती खात्रीनें अद्यावत् व पुरेशी नसल्यानें त्यांचाहि मनापासून आश्रय मिळत नाहीं. परिणामीं एकंदर ग्राहकसंख्या फार थोडी असल्यामुळें ( कदाचित् प्रत्यक्ष वाचकांची संख्या याहूनहि कमी असण्याचा संभव आहे) अर्थलाभ तर राहोच, पण प्रकाशनाचा खर्चहि लेखकावरच पडतो; व पुस्तकाची दुसरी आवृत्ति निघण्याचा योग क्वचितच येतो. राजसत्ता ( किंवा धनिक ) यांच्या आश्रयाखालीं कांहीं पुस्तकें प्रसिद्ध झालीं, परंतु त्यांचा शिक्षणसंस्थांतून उपयोग करण्याचें बंधन नसल्यामुळें प्रचारक्षेत्र संकुचित होतें; त्यामुळें त्यांत वापरलेली परिभाषा दृढमूल व स्थिर होऊं शकली नाहीं. ( कांहीं वेळां भाषेच्या क्लिष्टतेमुळें भाषांतरापेक्षां मूळ ग्रंथ वाचणें जास्त सोपें वाटतें हें वेगळेंच ). कांहीं खाजगी संस्थांकडूनहि पारिभाषिक शब्दांच्या याद्या प्रसिद्ध झाल्या आणि बऱ्याच मोठ्या प्रमाणावरील प्रयत्न ' इंटरनॅशनल ॲकेडमी ऑफ इंडियन कल्चर ' च्या विद्यमानें डॉ. रघुवीर यांनीं तयार केलेला कोश व परिभाषा हा होय.

### उस्मानिया विद्यापीठांतील प्रयत्न

विशेष उल्लेखनीय असा मोठ्या प्रमाणावर व पद्धतशीर प्रयत्न हैदराबादच्या उस्मानिया विद्यापीठाकडून झाला. येथें शिक्षणाचें माध्यम उर्दू भाषा होतें. विद्यापीठांत एक भाषांतर-शाखा व एक प्रकाशन-शाखा कायम करण्यांत आल्या होत्या, व प्रसिद्ध केलेलीं पुस्तकें पाठ्यपुस्तकें नेमण्यांत येत असत. या प्रयत्नामागें एका संपन्न संस्थानाच्या राजसत्तेचें आर्थिक पाठबळ होतें.

अशा परिस्थितींत देखील प्रत्यक्ष काय घडलें हें कळण्यासाठीं वैद्यकीय वाङ्मयाचे बाबतींतील कांहीं



अनुक्रमणिका

गोष्टी नमूद करणें अनुचित होणार नाहीं. भाषांतर करण्यासाठीं घेतलेल्या ग्रंथांत एक 'वैद्यकीय शब्दकोश' होता. याच्या भाषांतराची प्रगति फार मंद गतीनें चालू होती; परंतु मेडिकल् कॉलेजांतील शिक्षकांना, शिकविण्याचे कामीं पारिभाषिक शब्दांची निकड भासत होती; तेव्हां सबंध कोश छापून निघेपर्यंत वाट पाहण्याऐवजीं, तयार झालेल्या शब्दांपैकीं कांहीं व इतर कांहीं निवडक शब्दांसाठीं पर्याय शब्द तयार करून त्यांच्या सायक्लोस्टाईल केलेल्या प्रति शिक्षकांस देण्यांत आल्या; व जेथें उर्दू पर्याय शब्द नसेल तेथें इंग्रजी आंतरराष्ट्रीय-शब्द वापरण्याची परवानगी देण्यांत आली. बऱ्याच वेळां भाषांतरित ग्रंथ तयार होईपर्यंत मूळ ग्रंथाच्या अनेक नवीन आवृत्ति प्रकाशित होऊन भाषांतर निरुपयोगी ( Out-of-date ) झालेलें असे. पुस्तकांच्या छपाईला लागणारा खर्च आणि संभाव्य खपणाऱ्या प्रतींची अल्पसंख्या यांमुळें वरचेवर नवीन आवृत्तींचें मुद्रण-प्रकाशन शक्य नव्हतें. या सुरुवातीच्या काळांत वैद्यकीय नियतकालिकें स्थानिक भाषेंत काढण्याचा तर प्रश्नच नव्हता. कॉलेजांतून बाहेर पडल्यावर डॉक्टरांना इंग्रजी नियतकालिकें वाचणें अवश्य होतें. त्याकरितां इंग्रजी परिभाषा अवगत असणें जरूर होतें, तसेंच उच्च शिक्षणासाठीं परदेशांस ( बहुधा इंग्लंड अथवा अमेरिका ) गेल्यासहि इंग्रजी परिभाषा आवश्यकच होती. म्हणून विद्यार्थ्यांस इंग्रजी व उर्दू दोन्हीं परिभाषा शिकाव्या लागत. कित्येकदां तर विद्यार्थीच शिक्षकांस उर्दू पारिभाषिक शब्दांचे ऐवजीं इंग्रजी शब्द वापरण्याची विनंती करीत !

या एकंदर परिस्थितीमुळें कांहीं मनोरंजक पण बोधप्रद प्रसंग येत असत—

(१) परीक्षेच्या प्रश्नपत्रिका उर्दूत काढावयाच्या असत. परंतु पुष्कळदां असें होई कीं, परीक्षकाचा परिचय उर्दूपेक्षां इंग्रजीशीं जास्त असल्यांमुळें तो प्रथम इंग्रजींत प्रश्न काढून त्यांचें उर्दू भाषांतर करी; परंतु हें भाषांतर मूळ व इंग्रजी-पत्रिका भाषांतर म्हणून दाखल केलें जाई !

(२) एकदां कांहीं कट्टर उर्दू प्रेमियांनीं असा आग्रह धरला कीं, प्रिस्क्रिप्शन्स (Prescriptions) हि उर्दूंत लिहिलीं जावींत, परंतु वैद्यकखातें विश्वविद्यालयाच्या अमलाखालीं नव्हतें. तेव्हां एक मार्ग हा शक्य होता कीं, भाषांतर-खात्याची एक शाखा ज्या दवाखान्यांत शिक्षण दिलें जात होतें त्यांत ठेवावी. आर्थिक कारणाखेरीज इतरहि अनेक कारणांमुळें हें व्यवहार्य नव्हतें. तेव्हां कॉलेजच्या प्रिन्सिपॉलनें असा खुलासा केला कीं, प्रिस्क्रिप्शन्स (Prescriptions) ची भाषा इंग्रजी नसून लॅटिन असते; अशा रीतीनें हें प्रकरण मिटलें.

त्या काळांत एक अशी शिष्ट वहिवाट पडली होती कीं हैद्राबाद संस्थानाबाहेरील प्रसिद्ध व्यक्तींनीं हैद्राबादेस भेट द्यावी व जाहीरपणें विश्वविद्यालयांत एका देशी भाषेस माध्यमाचें स्थान दिल्याबद्दल सत्यापलापाचें पातक न करितां भरमसाट स्तुति करावी. मात्र त्याचवेळीं या प्रयत्नास जोरदार पाठिंबा देणाऱ्यांपैकीं पुष्कळजण आपल्या स्वतःच्या मुलांस इंग्रजी माध्यमाच्या संस्थांत व नंतर परदेशीं पाठविण्याची खबरदारी घेत.

देशी भाषांतून उच्च शास्त्रीय शिक्षण देण्याविषयींचा हा जिव्हाळा कांहीं व्यक्तींचे बाबतींत खराहि असेल परंतु अशा व्यक्ति स्वतंत्र भारताच्या राज्यव्यवस्थेंतील उच्चतम अधिकारपदावर येऊनहि देशी भाषांना इतर विश्वविद्यालयांतून माध्यमाचें स्थान मिळणें तर दूरच राहो, परंतु उस्मानिया विश्वविद्यालयांतूनहि उर्दूच्या जागीं इंग्रजीस परत आणण्यांत आलें हें लक्षांत घेण्यासारखें आहे.

२ पहाः Convocation Address by C. Rajagopalachari (27th Jan. 1944.)



अनुक्रमणिका






## उपाय-योजना

प्रस्तुत लेखाचा उद्देश देशी भाषांतून शास्त्रीय ज्ञान आत्मसात् करण्याच्या प्रयत्नास विरोध करण्याचा नसून या मुद्द्यावर भर देण्याचा आहे कीं, महत्त्वाची गोष्ट शास्त्राचा प्रत्यक्ष अभ्यास ही आहे, आणि पारिभाषिक शब्द तयार करणें उपयोगाचें किंबहुना आवश्यकहि असलें तरी तिचें महत्त्व गौण आहे.

संयुक्त भारतांत सामान्यपणें सगळीकडे नाहीं तरी बऱ्याच भागांत एकच शास्त्रीय परिभाषा स्वीकारण्यांत आली आणि एक लिपीहि वापरण्यांत आली तर शास्त्रीय ज्ञानाच्या प्रसारास पुष्कळच मदत होईल. कोणत्याहि भाषेचा किंवा परिभाषेचा प्रसार होण्यास केवळ तिच्यांतील अंतर्भूत स्वाभाविक गुण-श्रेष्ठत्व पुरत नाहीं, तर संख्येंत असणारांपैकीं लोकांनीं तिचा उपयोग केला पाहिजे; असें झालें तरच प्रसिद्ध केलेल्या पुस्तकांना पुरेसे वाचक-अभ्यासक मिळून तिचें व्यावहारिकरीत्या जीवित्व यशस्वी होणें शक्य आहे. नाहींतर अत्यंत कष्टानें व स्वार्थत्यागानें प्रसिद्ध केलेलीं पुस्तकें ग्रंथसंग्रहालयांतील कपाटांत केवळ भूषणें प्रदर्शनीय वस्तु म्हणून राहून अल्पकाळांत किडीच्या भक्ष्यस्थानीं पडतील.

या उद्दिष्टाचा स्वाभाविक विकासक्रम असा वाटतो कीं, शास्त्रीय शिक्षणास शाळांमधून देशी भाषेंत सुरुवात करावी. येथें क्षेत्र मोठें व पारिभाषिक शब्द थोडे आणि सुलभ वापरावे लागतील. क्रमशः वरच्या वर्गांत व उच्च शिक्षणांत प्रवेश सुलभ होईल. अर्थात मुख्य भर प्रत्यक्ष प्रायोगिक शिक्षणावर पाहिजे.

सामान्य परिभाषा व लिपी यांच्या स्वीकाराचे प्रयत्नांत विश्वविद्यालयें व शिक्षणाधिकारी यांनीं पुढाकार घ्यावा, ही एक महत्त्वाची गरज आहे.

---

## पुस्तकी ज्ञान व बुद्धि

किती वाचलें यावर बुद्धिमत्ता ही अवलंबून नसते; बुद्धिमत्ता हा एक मनाचा गुणधर्म आहे. बुद्धीच्या कार्यासाठीं तिला ज्याप्रमाणें जीवनांतून विषय मिळतो त्याचप्रमाणें अभ्यासानेंहि तिला केवळ साधनसामुग्री मिळते. लिहितां वाचतां न येणारीं अशीं कांहीं माणसें असतात आणि तीं अनेक उच्च शिक्षण घेतलेल्या लोकांहून बुद्धिमान् असून त्यांना जीवन आणि इतर गोष्टी यांचें अधिक चांगल्या प्रकारें आकलन असतें. या उलट चांगली बुद्धि वाचनानें अधिक प्रगल्भ होऊं शकते. याचें कारण वाचनानें तिच्या कार्यास अधिक साधन-सामुग्री मिळते. अशा अभ्यासानें आणि अधिक व्यापक क्षेत्रांत तिला कार्य करावयास मिळाल्यानें ती विकास पावते. परंतु केवळ पुस्तकी ज्ञानास स्वतःचें असें खरें महत्त्व नाहीं, बुद्धीस मदतनीस म्हणून तें उपयोगांत आणलें पाहिजे. तथापि पुष्कळ वेळां त्यानें मूर्खपणा व अज्ञानच वाढतें. अज्ञान वाढतें असें म्हणण्याचें कारण कीं, घटनांच्या मागील खरा अर्थ जर पहातां येत नसेल तर घटनांचें नुसतें ज्ञान व्यर्थ आहे.

—श्रीअरविंद



अनुक्रमणिका






श्री. य. रा. दाते

# चलनवाढीचा प्रश्न -- एक उद्बोधक चर्चा

सध्यां अनेक देशांत वस्तूंचे भाव भरमसाटपणें वाढत आहेत, याचें मुख्य कारण म्हणजे चलनवाढ हें होय असें बहुतेक जाणत्यांचें मत झालेलें आहे. तेव्हां या चलनवाढीस आळा कसा घालतां येईल या प्रश्नावर अनेक अर्थशास्त्रज्ञ, मुत्सद्दी व इतर जाणकार लोक विचार करीत आहेत. या विषयावर चांगला सांगोपांग विचार व्हावा व चर्चा व्हावी या उद्देशानें इंग्लंडमधील आल्टन व जिल्हा चेंबर ऑफ कॉमर्स या व्यापाऱ्यांच्या संस्थेनें एक निबंध-स्पर्धा जाहीर केली. या स्पर्धेस इंग्लंडचे प्रधानमंत्री यांनीं पाठिंबा दिला. तसेंच इंग्लंडचे चॅन्सेलर ऑफ दि एक्सचेकर यांनींहि या स्पर्धेचा पुरस्कार केला. टेलिव्हिजनवरूनहि या स्पर्धेची प्रसिद्धि करण्यांत आली. व ही स्पर्धा वृत्तपत्रांतूनहि जाहीर करण्यांत आली.

या स्पर्धेची सूचना व हस्तपत्रकें ग्रेटब्रिटन-मधील सर्व व्यापारी मंडळया अथवा चेंबर्स ऑफ कॉमर्स या संस्थांस व पार्लमेंटच्या सर्व सभासदांस पाठविण्यांत आलीं.

या स्पर्धेकरितां एकंदर ६६० निबंध आले. या निबंध पाठविणारांमध्यें सर्व निरनिराळया तऱ्हेचे धंदेवाईक, व्यापारी व अनेक तऱ्हेचे व्यवसाय कर-णारे व समाजाच्या निरनिराळया थरांतील लोक होते. इंग्लंडबाहेरील देशांतूनहि कांहीं निबंध आले होते. या निबंधांत कांही विनोद-प्रचुर, तर कांहीं काव्यमयहि होते. कांहीं निबंधांमध्यें लेखकांनीं आपलीं स्वतःचीं गाऱ्हाणीं मांडलीं होतीं तर कांहींनीं आपल्या विशेष आवडत्या योजना पुढें मांडल्या होत्या. तथापि बहुसंख्य निबंधांमध्यें ही जटिल समस्या सोडविण्यासंबंधीं मनापासून विचार करून उपायहि सुचविण्यांत आले होते. त्यांमध्यें चलन-वाढीचा प्रश्न, त्यामुळें वाढणारी भरमसाट महागाई वा पैशाच्या किंमतीची घसरगुंडी या गोष्टींचा सांगोपांग विचार केलेला होता.

या निबंधांमध्यें जी कारणमीमांसा दिलेली आहे व जे उपाय सुचविण्यांत आले आहेत ते आजच्या काळांत भरतखंडासहि उपयुक्त असल्यामुळें त्यांतील कांहीं मुद्दे सारांशरूपानें पुढें देण्यांत आले आहेत. ते इकॉनॉमिक डायजेस्ट या मासिकावरून येथें दिले आहेत.

## पहिल्या प्रतीच्या निबंधांतील विवेचन

पहिल्या प्रतीचें बक्षिस मिळविणाऱ्या निबंध-कारानें असें म्हटलें आहे कीं, वरील प्रश्नाची कारण-मीमांसा देण्यापूर्वी सामान्यतः आजची समाजाची प्रवृत्ति व मागील एक दोन पिढयांतील लोकांची प्रवृत्ति यांच्यामध्यें जो एक फरक प्रामुख्यानें आप-णांस दिसून येतो त्याचें प्रथम दिग्दर्शन करणें फार उपयुक्त होईल. कारण चालू पिढीच्या व मागील पिढयांच्या जीवनांतील दृष्टिकोणच आज फार बद-लून गेला आहे. आपणांस जी प्राप्ति होत असेल तींतच निर्वाह करावयाचा एवढेंच नव्हे तर त्यांतून कांहीं तरी काटकसर करून थोडाफार संचय करा-वयाचा ही वृत्ति मागील पिढयांमध्यें प्रामुख्यानें दृष्टीस पडत असे. परंतु आज सामान्यतः खर्चिक वृत्ति इतकी वाढली आहे कीं काटकसर हा शब्दच अपरिचित झालेला आहे व प्राप्त परिस्थितींत व होणाऱ्या प्राप्तींत निर्वाह करणें बाजूस राहून थोडा-







फार मर्यादेबाहेर खर्च करण्याची वृत्तीच जास्त बळावलेली दिसत आहे.

पूर्वी आगपेट्या एक आणा डझन याप्रमाणें मिळत होत्या परंतु त्या वेळींसुद्धां पूजेकरितां नीरांजन लावावयाचें तें आगकाडी ओढून न लावतां सणकाडीनें चुलींतील विस्तवावर लावून देण्याची गृहिणींची तत्परता दिसून येत असे. विडीचें व्यसन त्यावेळीं कमीच होतें पण ज्यास असेल तेहि आपट्याच्या पानाची किंवा केळीच्या सुखवताची विडी स्वतः करून घेऊन सणकाडीनें पेटवून ओढीत असत ही गोष्ट कांहींनीं प्रत्यक्ष पाहिलेली असेल. याप्रमाणें ही जी अल्पशी बचत होत असे त्यांतूनच गेल्या दोन युद्धांचा खर्च अनेक राष्ट्रांस भागवितां आला. एक म्हातारी एक आण्याला पांच याप्रमाणें मिळणाऱ्या सिगारेट पैशास एक याप्रमाणें विकीत असे व अशा तऱ्हेच्या रोजगारावर तिनें कांहीं घरें आपल्या मालकीचीं केलीं होतीं!

त्या वेळीं इंग्लंडच्या बँक ऑफ इंग्लंडमध्यें गेलें असतां आपण जर दोन पौंडांची नोट वटवून सोन्याचे दोन पौंड घेतले तर तेथील कारकून ती नोट घेऊन लागलीच तिचे दोन तुकडे करीत असे. त्या वेळीं पौंडाची किंमत विशेष होती व सोन्याचें चलन सररहा व्यवहारांत होतें म्हणून इंग्लंडची पत सर्व जगांत होती. 'इंग्लंडमध्यें तयार झालेला' हे शब्द असलेल्या मालाच्या उत्कृष्टतेबद्दल लोकांची खात्री होती. तशी आज राहिलेली आपणांस आढळून येत नाहीं.

याप्रमाणें मनुष्याच्या मनोवृत्तीमध्यें गेल्या ४०-५० वर्षांत कसा फरक पडत गेला आहे तो पाहिला म्हणजे त्या गोष्टीचा आपल्या आर्थिक परिस्थितीवर परिणाम झाल्याशिवाय राहिलेला नाहीं, ही गोष्ट लक्ष्यांत येते. या सर्व गोष्टी लक्ष्यांत घेऊन आतां सध्याच्या चलनवाढीची कारणमीमांसा करण्याकडे वळूं.

## चलनवाढीचीं कारणें

या चलनवाढीचीं कारणें या निबंधकारानें पुढीलप्रमाणें दिलीं आहेतः—

(१) कामगार व त्यांचे पुढारी यांचें पार्लमेंटमध्यें व बाहेरहि जीवनांतील आर्थिक समस्यांसंबंधीं दिसून येणारें अज्ञान; (२) सरकारला नोटा छापून वाटेल तेवढा पैसा निर्माण करतां येतो ही बालसुलभ पण बालिश कल्पना. सरकारी नोटेवर 'मी वचन देतों कीं'... इत्यादि शब्द छापलेले असतात त्यांचा खरा अर्थ किती लोकांना कळतो? १९१४ सालीं एका सोन्याच्या पौंडाची किंमत फ्रेंच पंचवीस फ्रँक इतकी व पांच अमेरिकन डॉलर इतकी होती ही गोष्ट किती लोकांना माहित आहे? पौंडाच्या नोटेवर छापलेल्या हमीची किंमत परदेशच्या बाजारामध्यें किती होती याची किती लोकांना कल्पना आहे? (३) इतिहासाचें विशेषतः गेल्या पन्नास वर्षांच्या इतिहासाचें अज्ञान; (४) बेजबाबदार व अनधिकृत पुढाऱ्यांनीं घडवून आणलेले बेफामवृत्तीचे संप; (५) एका दिवसाच्या योग्य मजूरीबद्दल एका दिवसाचें वाजवी काम देण्याच्या बाबतींत कामगारवर्गाची नाखुषी व कमी कामाबद्दल वाढती मजुरी मिळवण्याची आकांक्षा; (६) महिन्याच्या प्राप्तीमध्यें निर्वाह करून घेण्याऐवजीं पुढील महिन्याच्या पगारांतीलच कांहीं भाग आगाऊ खर्च करून टाकण्याची प्रवृत्ति; (७) साधें कल्याणकारी राज्य करण्याचीच पंचाईत असतां सर्वसमृद्ध असें कल्याणकारी राज्य झालें पाहिजे अशी गैरवाजवी अपेक्षा; (८) आर्थिक बाबतींमध्यें परदेशांमध्यें आपण आपणांसंबंधीं ज्या भलत्याच अपेक्षा निर्माण केल्या आहेत त्या आज इंग्लंडजवळ सोनें नसून त्या ऐवजीं परदेशास देण्यालायक वस्तू म्हणजे केवळ काम करण्याची तीव्र इच्छा एवढीच शिल्लक आहे या गोष्टीची वास्तविक जाणीव पाहिजे; (९) लष्करावर, आरमार वगैरेवर अतिशय डोईजड खर्च, तसेंच गैरलष्करी-








बाबी व राष्ट्रीय धंदे यांजवर होणारा बेसुमार खर्च; (१०) उत्पादन व वितरण यांच्या बाबतींत सह-कार्याचा अभाव. एका मंत्र्यानें भरमसाट किंमत देऊन घेतलेला माल दुसऱ्या मंत्र्यानें कवडीमोल म्हणून फुंकून टाकण्याची निरनिराळया खात्यांतील प्रवृत्ति.

एकंदर या चलनवाढीचीं व भाववाढीचीं कारणें अनेक असून त्यांतील एकावरच बोट ठेवून हेंच म्हणून सांगतां येणार नाहीं. तथापि वर दिलेल्या गोष्टींचा जो परस्परांवर व इतर गोष्टींवर परिणाम होतो त्यामुळें सध्याची परिस्थिति उत्पन्न झाली आहे. याप्रमाणें जर सध्याच्या बिकट परिस्थितीची आपणांस योग्य कारणमीमांसा लावतां आली तर तीवर योग्य उपाय शोधून काढणें कठिण जाणार नाहीं. आतांपर्यंत अर्थशास्त्र हा विषय केवळ विद्या-पीठांमध्यें व तेथेंहि उच्च वर्गांमध्यें शिकविण्याची जी आपली पद्धति आहे तिचा आतां आपणांस त्याग केला पाहिजे व या विषयास एखादें साधें व सोपें असें नांव देऊन तो शाळांमध्येंहि शिक-विण्याची तजवीज केली पाहिजे. (पूर्वी मराठी सहाव्या इयत्तेच्या वाचनपुस्तकांत जानु हवऱ्याची गोष्ट म्हणून कांहीं अर्थशास्त्रविषयक प्रमेयांवर फार मनोरंजक धडे लिहिलेले होते पण नवीन क्रमिक पुस्तकांत तो उपक्रम सोडून देण्यांत आला ही खरोखर परागतीच म्हटली पाहिजे ).

## उपाययोजना

सध्याचा आपल्या पुढील बिकट प्रश्न सोड-विण्याकरितां काय उपाययोजना करावयाची याचा विचार करतां असें वाटतें कीं, या गोष्टींचें सर्वांस सुलभरीतीनें ज्ञान व्हावें याकरितां एक लहानशी पुस्तिका काढावी आणि ती पुस्तिका प्रत्येक घरांत जाऊन पडेल अशी तजवीज करावी. या पुस्तिकेंत साध्या व सरळ भाषेंत पुढील गोष्टी नमूद करण्यांत याव्या.

१ आपला देश जर जिवंत रहावयाचा असेल तर तो केवळ पुढील गोष्टींमुळेंच जगूं शकेल.

(अ) आपल्या देशाच्या भूमीमध्यें जें आपण उत्पादन करूं;

(आ) आपल्या देशांतील खाणींतून जें आपण खणून काढूं;

(इ) आपल्या कारखान्यांत जो माल आपण तयार करूं;

(ई) आपण जो माल वाहून आणूं किंवा परदेशास वाहून नेऊं त्यावरच आपल्या देशाची उपजीविका चालूं शकेल.

२ आपली जी उत्पादनशक्ति आहे व जी उत्पादनक्रिया आपण करूं तिच्यामुळेंच आपणांस आयात मालाची किंमत देतां येईल व आवश्यक अशा अनुत्पादक क्रिया व समाजोपयोगी कार्यें करतां येतील.

३ या भाववाढीच्या मुळाशीं १९३९ मध्यें जी खाणमजुरांना पहिली पगारवाढ दिली ती आहे. तेव्हांपासून हें चक्र सुरूं झालें आहे.

४ त्यानंतर दिलेल्या प्रत्येक पगारवाढीबरोबर आपल्या मालाच्या किमती वाढत जाऊन तो पर-देशच्या बाजारांत मागें पडूं लागला आहे.

५ आयात मालाची किंमत आपण पौंडांच्या नोटांत देऊं शकत नसल्यामुळें आपला निर्यात माल हेंच खरोखर आपलें परदेशी बाजारांतील चलन आहे.

सदरहू पुस्तिका ही पक्षनिरपेक्ष असावी व तिच्यावर सरकारी मंत्र्यांच्याच नव्हे तर विरोधी पक्षाच्या पुढाऱ्यांच्याहि सह्या असाव्या. तरच लोक तिचा आदर करतील व तिचा अभ्यास करतील.

याबरोबरच सैन्यांतील वरच्या अधिकाऱ्यांच्या पगारांत आणि मुलकी अधिकाऱ्यांच्या पगारांत व राज्यकारभाराच्या खर्चांत आणि राष्ट्रीय केलेल्या उद्योगधंद्यांत कठोरपणानें छाटाछाट केली पाहिजे.

तसेंच अनेक बाबतींत होणारी उधळपट्टी व गैर-वाजवी खर्च कमी केले पाहिजेत. असें केलें म्हणजे मजूरवर्गाची एक मोठी तक्रार आणि वर्तमानपत्रांतील बेसुमार टीका यांची धार बोथट होईल. कारण सामान्य मनुष्य या वर्तमानपत्री टीका व मजूरांच्या गाऱ्हाणीं यांचेवरूनच आपलीं राजकीय मतें बनवीत असतो.

कामगारास काम करावयास लावण्याकरितां कांहींशी जरब तर कांहीं प्रलोभन दाखवावें लागतें. याकरितां पुढील अंदाजपत्रकांत वर सांगितलेल्या गोष्टींचा अन्तर्भाव केला पाहिजे. परंतु गेल्या अंदाजपत्रकांत यापैकीं एकहि गोष्ट आढळत नाहीं.

थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे आपण आतां कामगार व त्याची पत्नी यांस सध्यांच्या परिस्थितीबद्दलची वास्तविक वस्तुस्थिति नीट समजावून सांगितली पाहिजे व तिची कारणमीमांसा आणि तीवरील उपाय हींहि त्यांस उलगडून दाखविलीं पाहिजेत. नंतर त्यांच्या मुलांसहि या गोष्टींचें शिक्षण दिलें पाहिजे. जेव्हां अत्युच थरांतील लोक आपल्या कृतीनें उदाहरण घालून देतील तेव्हांच खालच्या वर्गांतील लोकांस त्यांचें कर्तव्य करण्यास व त्यांचा भाग उचलण्यास सांगण्याचा त्यांस अधिकार येईल. याप्रमाणें वस्तुस्थितीची माहिती देणें व त्यांचें मन वळविणें या दोन उपायांनीं आपण सध्याच्या अडचणींतून पार पडूं अशी आशा करूं या.

## दुसरा दृष्टिकोण

एका प्रवक्त्यानें तर असें म्हटलें आहे कीं, सध्यां सरकारास पेंचांत आणण्याकरितां, निरनिराळ्या अनेक प्रकारच्या सबबींवर वरचेवर संप करण्यांत येतात आणि वाजवीपेक्षांहि जास्त पगारवाढीची मागणी करण्यांत येते पण त्याबरोबर वैयक्तिक उत्पादनामध्यें वाढ करण्याची मात्र हमी देण्यांत येत नाहीं. त्यामुळें ही कृति म्हणजे स्वतःचें नाक कापून सरकारास अपशकून करण्यासारखें आहे. तेव्हां ही गोष्ट प्रत्येक नागरिकाच्या लक्ष्यांत आणून देण्याचें काम पक्षनिरपेक्ष पद्धतीनें केलें पाहिजे व हीच गोष्ट सध्यांच्या चलनवाढीच्या मुळाशीं आहे हें त्यास पटवून दिलें पाहिजे. याकरितां प्रत्येक व्यक्तीनें सरकारशीं सहकार्य केलें पाहिजे.

भरमसाट पगारवाढीनें मालाचें उत्पादनमूल्य वाढतें व त्यामुळ त्याची विक्रीची किंमत वाढते, एवढेंच नव्हे तर परदेशी बाजारांत तो माल स्पर्धेमध्यें टिकूं शकत नाहीं. याकरितां अशी भरमसाट पगारवाढ मागणारे लोक हे आत्मघाताची वाटचाल करीत आहेत हें निश्चित होय.

सध्यांच्या ब्रिटनच्या मजूरी व पगार यांच्या तक्त्यांत जर सर्वसाधारण वाढ झाली तर पौंडाचें अवमूल्यन होऊन त्याचा शेवट एकतंत्री सत्तेची वाढ व वैयक्तिक स्वातंत्र्याचा संकोच यांमध्यें झाल्याशिवाय रहाणार नाहीं. याकरितां पुढील उपाय सुचविण्यांत आले आहेत :

१. यापुढें प्रत्यक्ष वैयक्तिक कामगाराच्या उत्पादनांत वाढ होण्याची खात्री पटेल असा पुरावा दिल्याशिवाय पगारवाढीची मागणी केल्यास तीस स्पष्ट शब्दांत व निश्चितपणें नकार दिला पाहिजे.

२. कामगारांच्या युनियनच्या सभेंत गुप्त मतदान पद्धतीनें व युनियनच्या बाहेरच्या एखाद्या संस्थेच्या देखरेखीखालीं झालेल्या मतदानांत दोनतृतीयांश मतें मिळून मान्य झाल्याशिवाय कोणताहि संप कृतींत आणतां कामा नये व तसा आणल्यास तो बेकायदा समजण्यांत यावा.

३. संपावर गेलेल्या कामगारांस कोणत्याहि प्रकारची राष्ट्रीय मदत देण्यांत येऊं नये. संपावर गेलेल्या कामगारांस पूर्णपणें त्याच्या युनियननें साहाय्य दिलें पाहिजे. त्यांच्या कुटुंबाच्या पोषणाचा भार सामान्य कर देणारांवर पडतां कामा नये. असें झालें म्हणजे कामगारांच्या बायकाच त्यांस परस्पर कामावर पाठविण्याची तजवीज करतील. इंग्लंडमध्यें








होणाऱ्या अनेक संपांमुळें इंग्लंड आज धुपून निघाला आहे व त्याचें रक्तशोषण झालें आहे.

४ कोळशाच्या खाणी चालविण्याकरितां आज पुरेसे मजूर मिळत नाहींत याकरितां परकीय मजुरांची भरती करण्यांत यावी. या गोष्टीस युनियनच्या अधिकाऱ्यांचा विरोध आहे पण राष्ट्रीय कोळसा बोर्डानें या गोष्टीचा अवलंब करावा. आज इंग्लंड, अमेरिका व इतर देशांतून कोळसा आयात करीत आहे व याकरितां फार मोठी डॉलर्सची परदेशी हुंडणावळ खर्ची पडत आहे. इंग्लंडची नैसर्गिक संपत्ति भूमिगत आहे ती वर काढली पाहिजे म्हणजे कोळशावरचें नियंत्रण उठेल व अधिक माल बाहेर पाठवितां येईल.

५. सरकारच्या राज्यकारभार-खर्चास निक्षून कात्री लावली पाहिजे. जेव्हां देशाच्या स्वाभाविक उत्पन्नापैकीं केन्द्रीय व स्थानिक कारभाराकरितां पंचवीस टक्क्यांपेक्षां अधिक खर्च पडूं लागतो त्यावेळीं चलनवाढ सुरू होते. सध्यां हा कारभार-खर्च वेचाळीस टक्के आहे. याचा अर्थ उघड आहे कीं, हे वरील सतरा टक्के रक्कम कोणत्या ना कोणत्या तरी कराच्या रूपानें वसूल करावी लागते.

६. विक्रीकर अजीबात बंद करण्यांत यावा. तसेंच तंबाखू, मद्य, अर्क व आसवादि पेयें, तसेंच पेट्रोल व करमणुकीवरील कर हे सर्व बंद करण्यांत यावेत. यामुळें उत्पन्नांत पडणारी तूट, पगार वगैरे-मध्यें कपात करून भरून काढावी. आज केवळ विक्रीकर वसूल करण्याकरितां कितीतरी कर्मचाऱ्यांस नेमावें लागत आहे. हा तिरस्कारार्ह कर केवळ कृत्रिम उत्पन्न वाढविणारा असून तो बंद केल्यास राहणीचा खर्च कितीतरी कमी होईल आणि त्यामुळें चलनवाढीस बराच आळा बसेल. ठोक मालाच्या व्यापाऱ्यांकडून हा कर वसूल करण्यांत येतो व त्यांस याच्या हिशोबाकरितां कितीतरी माणसें ठेवावीं लागतात व त्यांचा सर्व खर्च पुढें किरकोळ माल विकत घेणाऱ्यांवर लादला जातो. तो केवढा तरी मोठा खर्च वाचेल व या कामांतून मोकळा झालेला पांढरपेशा नोकरवर्ग इतर ठिकाणची अशा नोकरांची टंचाई दूर करील.

७. खाद्य पदार्थ तयार करण्याकरितां सध्यां, मालाचे दर टिकवून धरण्याकरितां, उत्पादनाकरितां वगैरे जी मदत देण्यांत येते ती बंद केल्यास आज जो या कामीं वीस कोटी ते पंचवीस कोटी पौंड खर्च करण्यांत येतो तो वांचेल. याशिवाय या कामाकरितां जो कारकुनी व कारभारी-खर्च करण्यांत येतो त्याचीहि बचत होईल. शेती करण्याकरितां जर सरकार मदत करीत जाईल तर शेतीच्या उत्पादनाची कार्यक्षमता कमी होत राहील व त्यामध्यें स्पर्धा राहणार नाहीं.

८. आयात खाद्य मालावरील सर्व कर काढून टाकण्यांत यावे. या बाबतींत राहणीचा खर्च कमी कमी व्हावा याकरितां वस्तूंच्या किमती कमी राहतील इकडे दृष्टि असावी. जर ब्रिटिश शेतकऱ्याला परकीय शेतकऱ्यांइतकें उत्पादन आपल्या शेतांत करतां येत नसेल तर मुळांतच कांहींतरी दोष असला पाहिजे. या बाबतींत शेतकरी लोकांचें सार्वमत घेतल्यास याचें कारण समजण्याचा संभव आहे.

९. शेतीच्या जमिनीचें पुनः मूल्यमापन करण्यांत यावें आणि औद्योगिक कारखान्यांनीं व्यापलेल्या जमिनीचें पुन्हां मूल्यमापन करून त्यावरून सुधारलेली व समतोल कर-आकारणी करण्यांत यावी. किरकोळ धंद्याकरितां व्यापलेल्या जमिनीवरील डोईजड कर कमी करण्यांत यावे किंवा पूर्ण माफ करण्यांत यावे व त्यांचा बोजा मोठ्या उद्योगधंद्यावर लादून किरकोळ मालाच्या किमती उतरण्यास मदत करण्यांत यावी.

कल्याणकारी राज्य करण्याकरितां जो आर्थिक बोजा स्वीकारण्यांत आला आहे आणि १९४४ च्या शिक्षणविषयक कायद्यानें जो भार पडलेला आहे त्यांत कांहीं छाटाछाट करणें शक्य असल्यास तो प्रयत्न करावा. याप्रमाणें वर दिलेल्या नऊ मुद्द्यांचा विचार












करून उपाययोजना केली तर चलनवाढीस आळा बसण्याचा बराच संभव आहे.

### तिसऱ्या लेखकाच्या सूचना

तिसऱ्या एका गृहस्थानें असें सुचविलें आहे कीं,

१. पहिली गोष्ट म्हणजे बाजारांत सर्व मालाची समृद्धि होईल अशी तजवीज करणें. यामुळें लागलींच किंमती उतरतील व कामगारांची वेतनवाढीची मागणी पुढें येणार नाहीं. सर्वप्रथम खाद्य पदार्थांच्या किंमती उतरल्या पाहिजेत. त्याबरोबर सरकारी कर्जें व कागदी चलन यांस आळा घातला पाहिजे. यामुळें लोकांची बचत करण्याची प्रवृत्ति वाढेल व नवीन भांडवल मिळूं शकेल.

२. दुसरी गोष्ट भाडें-नियंत्रण कायदे रद्द करावे व आर्थिकदृष्ट्या समतोल भाडें आकारण्यास मालकांस मुभा असावी.

३. सरकारी कारभार-खर्चास कात्री लावावी. तसेंच कल्याणकारी राज्य म्हणून ज्या सवलती देण्यांत येतात त्यांचाहि विचार करावा व ज्यांस ऐपत आहे त्यांस मोफत सवलती मिळूं नयेत अशी तजवीज करावी. ज्या लोकांस औषधोपचार करून घेण्याची ऐपत आहे त्यांस तो मोफत मिळूं नये. लोकांनीं प्रत्येक बाबतींत सरकारकडे पाहूं नये व आपआपली जबाबदारी पत्करावी. यामुळें कुटुंब हा राष्ट्रघटक मानण्याकडे प्रवृत्ति वाढेल व प्रत्येक कुटुंब स्वयंपूर्ण होण्याचा प्रयत्न करील. अशा स्वावलंबी लोकांस उत्तेजन देण्यांत यावें व त्यांची चहा व्हावी म्हणजे इतरांस त्यांचें अनुकरण करावेसें वाटेल व प्रत्येक कुटुंबास सरकारतर्फें मिळणाऱ्या कोणत्याहि वस्तूपेक्षां स्वतःस पाहिजे असलेली व हौसेची वस्तु घेतां येईल. याप्रमाणें प्रत्येक कुटुंब स्वावलंबी व स्वयंपूर्ण झालें तर सर्व राष्ट्र स्वयंपूर्ण होईल.

४. जर आपणांस आवश्यक असलेला कच्चा माल व उपभोग्य वस्तु स्वस्त दरांत विकत घेतां आल्या नाहींत तर आपण आपल्या तयार मालाच्या बाबतींत जर्मन किंवा इतर लोकांशीं स्पर्धेत टिकणार नाहीं. आयातीवरील निर्बंध काढून टाकल्यास निरनिराळ्या प्रकारच्या मालासंबंधीं मक्तेदारी नाहींशी होईल आणि भांडवल व मजूरी या दोहोंच्या बाबतींत माजलेली कोंडी फुटेल.

५. १९१४ सालापूर्वीं जी निरनिराळ्या क्षेत्रांत स्पर्धा होती ती नाहींशी झाल्यामुळें ट्रेड युनियनस्‌ची सत्ता फार वाढलेली आहे. आयातीवरील निर्बंध काढून टाकल्यास ट्रेड युनियन व शेतकरी-संघ इत्यादींचें सामर्थ्य कमी होईल.

६. याप्रमाणेंच १९४७ सालचा शेतकी कायदा रद्द करण्यांत यावा व निरनिराळ्या मालाच्या उत्पादनाकरितां देण्यांत येणारी मदत व किंमतीची हमी बंद करण्यांत यावी. शेतकऱ्यानें आपणांस लागणारें खत वगैरे सामान स्वस्त मिळेल त्या बाजारांत खरेदी करावें व त्यांच्यावरील देखरेख कमी करून सर्वांस खुलें रान करून द्यावें. चलनावरील नियंत्रण कमी करून सर्व व्यवहार पूर्ववत् बँक ऑफ इंग्लंडच्या स्वाधीन करावा. तसेंच परदेशी हुंडणावळीवरील निर्बंधहि दूर करण्यांत यावेत. असें केल्यास निर्यात व्यापार वाढेल व जहाजी-वाहतूक, विमा, परदेशांतील बँक व्यवहार व परदेशी गुंतणारें भांडवल यांत वाढ होईल व परदेशी व्यापारहि वाढेल. या गोष्टींत कारखानदारीची आवश्यकता नसते व प्रवासी लोकांपासून मिळणाऱ्या उत्पन्नाप्रमाणें याचीहि वाढ होऊं शकते. या बाबतींत व्यवहारस्वातंत्र्य आणि सेवेची उच्चता यांची आवश्यकता असते.

७. याकरितां सोन्याचा पौंड पुन्हां व्यवहारांत आणून कागदी चलन कमी करण्यांत यावें व पौंडाची किंमत बाजार-भावाप्रमाणें स्थिर होऊं द्यावी.

### चलनवाढ कां होते ?

चवथ्या एका गृहस्थानें प्रथम चलनवाढ म्हणजे काय व ती कां होते या प्रश्नांचीं उत्तरें अशीं दिलीं आहेत कीं, जेव्हां निरनिराळ्या वस्तु व आवश्यक

कामें यांचें मूल्य एकसारखें पैशाच्या रूपामध्यें वाढत जातें तेव्हां चलनवाढ होते व ती होण्याचें कारण लोकांची पैसे, बँकेजवळील पत वगैरेमुळें क्रयशक्तीची इतकी वाढ होते कीं, ती प्रत्यक्ष माल व आवश्यक कामें यांच्या उत्पादनापेक्षां अधिक होते.

चलनवाढ होणें किंवा चलनाची चणचण भासणें या दोन्हींहि गोष्टी सरकारच्या जमाबंदीच्या धोरणावर अवलंबून असतात. मनुष्य ज्या परिस्थितींत असेल त्या परिस्थितीचा आपल्या लाभासाठीं त्यानें उपयोग करून घेणें हें अगदीं स्वाभाविक आहे. जरी चलनवाढीस सरकारी धोरण हेंच कारण असलें तरी तिचा परिणाम अधिक तीव्र करणें हें मनुष्याच्या किंवा कांहीं मानवसंघांच्या हातांत असतें. उदाहरणार्थ, जिन्नसांच्या भाववाढीबरोबर पगारवाढीकरितां ट्रेडयुनियन संस्थांनीं दबाव आणणें किंवा उत्पादनखर्चाच्या वाढीबरोबर व्यापाऱ्यांनीं व कारखानदारांनीं किंमतीमध्यें वाढ करीत राहणें या गोष्टी या प्रकारच्या आहेत.

पैसा ही संपत्ति आहे अशी मनुष्यप्राण्यानें आतांपर्यंत होऊन गेलेल्या सर्व संस्कृतींमध्यें एक चुकीची समजूत उराशीं बाळगून ठेविली आहे. परंतु एखाद्या ओसाड बेटावर जर एखाद्या मनुष्यास पैशाच्या थैल्या देऊन सोडला तर त्यांचा त्यास कांहीं उपयोग व्हावयाचा नाहीं ही गोष्ट स्पष्ट आहे.

दुसरी एक अशीच कल्पना रूढ आहे कीं, चलनवाढीस पायबंद घालावयाचा उत्तम उपाय म्हणजे करवाढ करणें हा होय. [ सध्याचे भारताचे अर्थमंत्री या जादूचा उपयोग करीत आहेत ]. परंतु येथें ही गोष्ट लक्ष्यांत घेतली पाहिजे कीं प्रत्येक कराचा परिणाम पदार्थांच्या उत्पादनखर्चांत वाढ होणें हा अटळ आहे. आणि पदार्थांच्या किमती वाढल्या कीं, मजूरीमध्यें वाढ मागणें अपरिहार्य होतें.

## कांहीं उपाय

या गोष्टीस या गृहस्थानें थोडा कठोर उपाय असा सुचविला आहे कीं, या प्रश्नाकडे जर केवळ आर्थिकदृष्टया पहावयाचें असेल व त्यांत राजकारण आणावयाचें नसेल तर प्रथम ही गोष्ट केली पाहिजे कीं, लोकांची क्रयशक्ति व पत हीं कमी केलीं पाहिजेत. याकरितां व्याजाचे दर वाढविले पाहिजेत व बँकांनीं कर्ज देण्यांत हात आखडता घेतला पाहिजे. हें धोरण इतके दिवस चालविलें पाहिजे कीं, फार मोठया प्रमाणावर बेकारी वाढेल आणि फक्त कांहीं विशेष मजबूत व कार्यक्षम कंपन्यांशिवाय बाकीच्या भुरटया लोकांचा धंदा पार बसून जाईल. अशा वेळीं प्रत्येकजण कमी पैशांत काम करण्यास राजी होईल व उत्पादन-खर्च खालीं येईल.

परंतु सध्याच्या काळांत असला अघोरी उपाय योजावयाचा झाल्यास व दीर्घकाल चालू ठेवावयाचा झाल्यास त्याचें फल पदरांत पडावयाच्या अगोदरच असें धोरण अंगीकारणाऱ्या राज्यसंस्थेस आत्महत्या करण्याचा प्रसंग येईल. वस्तुतः इंग्लंडमध्यें १९२६ सालीं या उपायाचा अवलंब करण्यांत आला होता. परंतु त्याचा परिणाम सार्वत्रिक संप होण्यामध्यें व १९३० सालीं भयंकर मंदी येण्यामध्यें झाला व अखेरीस इंग्लंडला सुवर्णचलन सोडून द्यावें लागलें.

अशा तऱ्हेचें धोरण सध्याच्या राजकीय परिस्थितीमध्यें शक्य आहे किंवा नाहीं हा प्रश्न जरी बाजूस ठेवला तरी सध्याच्या परिस्थितीमध्यें उद्योगांचें राष्ट्रीयीकरण करीत असतां व समाजकल्याणकारी राज्याचा उदोउदो करीत असतां असलें धोरण स्वीकारणें अशक्य आहे. जरी चलनवाढ ही पूर्वीच्या राजवटींतहि कांहीं प्रमाणांत आधींच झालेली होती तरी उद्योगधंद्यांचें राष्ट्रीयीकरण व समाज कल्याणकारी राज्यपद्धती यांच्या योगानें तिच्यांत भर पडलेली आहे ही गोष्ट निश्चित आहे.



अनुक्रमणिका







वास्तविक आज जर कांहीं घडवून आणण्याची आवश्यकता असेल तर ती गोष्ट म्हणजे बेकारी उत्पन्न करणें ही नसून प्रत्येक व्यक्तीमध्यें दिवसभर प्रामाणिकपणानें काम करून शक्य तितकें उत्पादन वाढविण्याची कोशीस करण्याची प्रवृत्ति निर्माण करणें ही आहे. सध्यांच्या डोईजड कराच्या ओझ्याच्या भाराखालीं ही गोष्ट साध्य करणें सुतराम् शक्य दिसत नाहीं. ट्रेड युनियन्सची सध्यांची उत्पादनावर निर्बन्ध घालण्याची, हळू काम करण्याची, प्रवृत्ति नष्ट झाली पाहिजे. सध्यां ज्या ट्रेड युनियन्सना सवलती देण्यांत आल्या आहेत त्या बेकारी ज्या वेळीं अतिशय तीव्र स्वरूपांत होती त्या वेळीं दिलेल्या आहेत. त्यांच्यापासून आज हानीच होण्याचा संभव आहे. सध्यांच्या आर्थिक परिस्थितीची सर्वसामान्य लोकांस प्रसिद्धी करून जाणीव करून दिली पाहिजे आणि उत्पादन-वाढीवर बोनस जाहीर करून किंवा अन्य उपायांनीं उत्पादन वाढविलें पाहिजे. लोकांस पैशाच्या रूपांतील मजूरी व प्रत्यक्ष-मजूरी यांतील भेद कळला पाहिजे. अशा गोष्टी त्यांस समजावून सांगितल्या पाहिजेत. योग्य पुढारीपण मिळाल्यास सर्व कांहीं शक्य आहे.

करवाढ कमी झाल्याशिवाय व सरकारी कारभारखर्च कमी झाल्याशिवाय कांहीं करतां येणें शक्य नाहीं. सर्व प्रकारची सरकारी-मदत व देणगी बंद केली पाहिजे. प्रत्येक वस्तूची खरी उत्पादन किंमत काय ती लोकांस कळून आली पाहिजे आणि जर त्यांस कांहीं सोयींची खरोखर जरूर वाटत असेल तर त्यानीं त्याकरितां योग्य ती किंमत दिली पाहिजे व त्याकरितां त्यांनीं काम करण्यास शिकलें पाहिजे. कामगारांस धंद्यांतील फायद्यामध्यें भागीदारी मिळण्याच्या कामीं उत्तेजन दिलें पाहिजे व उत्पादन आणि कार्यक्षमता यांची वाढ केली पाहिजे.

आज सरकारी व स्थानिक कार्यालयांची भरमसाट वाढ होत आहे व नोकरशाही ही नोकरांऐवजी मालक बनत चालली आहे.

लोकांना त्यांच्या श्रमाचा भरपूर फायदा मिळूं द्या. कामगारांस फायद्यांत भागीदारी द्या आणि श्रम करणें हें त्यांस लाभदायक होऊं द्या.

### आजचा इंग्रज

एका गृहस्थानें सध्यांच्या इंग्रज मनुष्याच्या अधोगतीची पार्श्वभूमि मोठ्या सुंदर रीतीनें वर्णन केली आहे.

त्याचें म्हणणें असें आहे कीं, इंग्रज मनुष्य आजहि पूर्वीप्रमाणेंच अगदीं चांगला धट्टाकट्टा असून त्यास झोंप चांगली लागते, तो चांगलें खातोपितो, आणि अनेक प्रकारचे खेळ व करमणुकीचे प्रकार यांत परकीयास आश्चर्य वाटेल इतक्याप्रकारें रममाण होतो.

परंतु आज तो जरा भ्रमांत आहे. त्याला पूर्वीप्रमाणेंच जगानें आपणास आजहि चांगल्या तऱ्हेचा आयुष्यक्रम घालवूं दिलें पाहिजे असें वाटतें. परंतु आज त्याच्याबद्दल मत्सर व क्रोध जगांतील सर्व लोकांस वाटत आहे ही गोष्ट त्यास कळून येत नाहीं. त्याचा शेजारी फ्रेंच मनुष्य हा तर त्यास 'परफीडिअस आलबिअन' असें कित्येक दिवस म्हणत आहेच. पण कालच पुढें आलेला नासेर हाहि त्यास "तिटकारा येण्यासारखा ( लोदिंग )" असें विशेषण लावीत आहे.

ही इंग्रजाची मनोभूमिका त्याची वडिलार्जित आहे. ही त्यास 'औद्योगिक क्रांतिकारक' अशा त्याच्या बापापासून किंवा आजोबापासून प्राप्त झाली आहे. पण तो त्याचा बाप किंवा आजा कष्ट करणारा होता, तो साहसी होता, त्यानें नवीन-नवीन भूखंड शोधून काढून त्यावर वस्ती केली होती, वसाहती स्थापन केल्या होत्या, त्यानें अनेक अनेक नवे शोध लावले होते, कारखाने उभारले होते, बंदरें, गोद्या बांधल्या होत्या, त्यांत सुधारणा










केल्या होत्या, त्यानें आपल्या देशास सर्व ' जगाचा कारखाना ' बनविलें होतें.

त्याच्या काळांत जर्मनीमध्यें अंगुष्ठमात्र राज्यें होतीं, रशियामध्यें सरंजामशाही होती. आफ्रिका ' कृष्णखंड ' होतें, अमेरिकेंतील शेतकरी यादवी युद्धांत गुंतले होते, ऑस्ट्रेलियन लोक तद्देश्य-लोक व ससांचें वारेमाप पीक यांचें उच्चाटन करण्यांत गुंतले होते, जपान मध्ययुगीन अवस्थेंतील एक सीलबंद राष्ट्र होतें आणि इंग्रजी नाण्यावर ' भारताची बादशाहीण ' असा शिक्का होता आणि भारत हा इंग्रजी राजमुकुटांतील मौल्यवान हिरा होता.

त्यावेळीं ब्रिटानियाची समुद्रलहरींवर हुकमत चालत होती, इंग्रजी साम्राज्यावर सूर्य मावळत नव्हता. इतर राज्यें त्यावेळीं खिजगणतींत नव्हतीं. इंग्लंड हें त्यावेळीं खरोखरच जगाचा एकमेव कारखाना होता. त्यांत तयार झालेल्या मालास सर्व पेठा मोकळ्या व मागणी अतिशय होती व ' इंग्लंडमध्यें तयार झालेला ' या शिक्क्यास सर्वत्र मान होता. बाहेर देशांतील कच्चा माल मातिमोलानें मिळत होता.

इतर देशांतील अनेक लोकांची उपजीविका इंग्लिश लोकांच्या कारखान्यांवर अवलंबून होती. त्यांनीं बांधलेल्या रेलवे, बंदरें, गोद्या, धरणें, कालवे, मिशनच्या शाळा, इस्पितळें, गिरण्या, कारखाने, व ते चालविण्याचें कौशल्य या सर्वांचा मक्ता इंग्रजाकडे होता. आतां नवीन नवीन राष्ट्रें उदयास येत आहेत. वसाहती व परतंत्र प्रदेश स्वतंत्र होत आहेत. ज्या देशांतील कच्चा माल त्याच देशांत उपयोगांत आणला जात आहे. त्या देशांत कारखाने निघत आहेत व आमच्या मालाची आतां त्यांस गरज राहिली नाहीं. आतां चहा, कॉफी, कथील, रबर, कापूस, खोबरें वगैरे माल त्या त्या देशांस पुरून उरला तर, खुल्या बाजारांत अधिक किंमत देऊन आम्हांस विकत घ्यावा लागत आहे.

याच काळांत इंग्रज लोकांस दोन महायुद्धांस तोंड द्यावें लागलें. युद्धकाळांत त्यांच्या कारखान्यांत नेहमीच्या मालाऐवजीं दारूगोळा व युद्धोपयोगी सामान तयार करावें लागलें. त्यामुळें नेहमीची मालाची निर्यात संपुष्टांत आली. आयात वाढली व आयात होणाऱ्या मालापैकींहि पुष्कळसा माल मार्गांत समुद्रांत बुडाला. या काळांत आयात मालाची किंमत पूर्वजांनीं उभारलेल्या दूरदूरच्या देशांत असलेल्या रेलवे, गोद्या, खाणी व मळे यांच्या रूपानें द्यावी लागली. याप्रमाणें पूर्वजांच्या कमाईवर गेलीं पन्नास वर्षें इंग्रजांनीं काढलीं व गेलीं दहा वर्षें तर त्यांस मोठ्या कष्टाचीं गेलीं हें सर्वांस माहीत आहेच.

या गोष्टीला आतां उपाय काय ? या कोंडींतून अणुशक्तीनें किंवा स्वयंचलित यंत्रपद्धतीनें मार्ग निघणार नाहीं, कारण तीं केवळ सुधारलेलीं यांत्रिक साधनें आहेत. यावर एकच उपाय म्हणजे जो एखादा रिणको सावकाराचें देणें थकलें व त्याचा तगादा लागला म्हणजे करतो तोच होय. तो म्हणजे आपल्या राहणीचा खर्च कमी करणें, कोट टाकून देऊन शर्टवर निर्वाह करणें, परदेशांतील सहली बंद करणें व आपल्याच बागेंत कुदळ फावडें घेऊन काम करणें, मोटारी, टेलिव्हिजन, स्वत: किल्ली देणारें घड्याळ, सहलीची बोट वगैरे गोष्टी, शेजाऱ्या परकीय राष्ट्रांस येईल ती किंमत देऊन विकून टाकणें आणि आपली राहणी साध्या पातळीवर आणून आपल्या खऱ्या प्राप्तींत निर्वाह करूं लागणें हा होय.

हें सत्य कानाला रुचणारें नाहीं, परंतु इंग्रज हा आतां त्याच्या शेजाऱ्यांच्या दृष्टीनें दिवाळखोर बनला आहे आणि त्यास आपला कोट अंगावर कायम ठेवावयाचा असेल तर त्यानें तयार केलेल्या वस्तु शेजाऱ्यास त्यास परवडेल व त्यास त्या स्वत: तयार करण्यापेक्षां स्वस्त वाटेल अशा किंमतीस विकल्या पाहिजेत.








हें कटुसत्य पार्लमेंटमधील त्याचा प्रतिनिधि त्यास सांगत नाहीं याचें कारण त्यास पुढील निवडणुकींत मत पाहिजे असतें हेंच आहे.

## निर्यातवाढीची गरज

आणखी एका गृहस्थानें असें सुचविलें आहे कीं, चलनवाढीवर जी उपाययोजना करावयाची ती हा राष्ट्रीय प्रश्न असल्यामुळें सरकारनेंच केली पाहिजे आणि पत-निर्बन्धासारखे जे उपाय अमलांत आणावयाचे ते माल निर्यातीच्या धोरणाच्या आड येतील असे नसावे. चलनवाढ ही आज सर्वच देशांत होत आहे परंतु इतर देशांनीं अवलंबिलेले उपाय इंग्लंडमध्यें उपयोगी होतीलच असें नाहीं. मुख्य गोष्ट आपली परदेशी निर्यात येनकेन प्रकारेण वाढविणें ही आहे. याकरितां मालाच्या किंमती स्थिर ठेवणें, योग्य व ठरलेल्या मुदतींत माल देण्याची ग्राहकास हमी देणें, याकरितां कारखाने, ट्रेडयुनियन व ग्राहक यांत सहकार्य उत्पन्न करणें व मजूरी आणि नफा यांवर नियंत्रण घालणें अवश्य आहे. तसेंच आयात-निर्यात कर स्थिर ठेवणें किंवा सगळीकडेच अजीबात काढून टाकणें हेंहि जरूर आहे.

याकरितां पुढील उपाय योजण्यांत यावेत : एक त्रैवार्षिक योजना करावी.

१ पतीवर कडक निर्बन्ध घालावे. (विशेष गोष्टींत न्यायासनानें सूट द्यावी).

२ परदेशी माल निर्यात करणाऱ्या कारखान्यांस करांत सवलती द्याव्या.

३ विशिष्ट उद्योगधंदे व खाणी यांतील जादा कामाकरितां मिळणाऱ्या मजूरीवरील कर पूर्ण माफ करावा.

४ पौंडाच्या बदलत्या किंमतीप्रमाणें अवश्य तर बँकेचा व्याजाचा दर वाढविण्यांत यावा.

५ सरासरी तीन वर्षांकरितां मालाच्या किंमती ठरवून देण्यांत याव्या.

६ परदेशांतून येणारा कोळसा बंद झाला पाहिजे व आपला कोळसा बाहेर गेला पाहिजे याकरितां अवश्य ते सर्व उपाय योजण्यांत यावेत.

७ सरकारनें पौंडाची किंमत स्थिर राहील अशा पद्धतीनें अंदाजपत्रक तयार करावें. आणि त्या धोरणास अनुसरून मुलकी व फौजी अधिकाऱ्यांचे पगार व त्या खात्यांचा खर्च आकारण्यांत यावा.

याकरितां सरकारनें कामगार, मालक, घरधनिणी यांची समजूत घालण्याचा प्रयत्न करावा म्हणजे हें त्रैवार्षिक अंदाजपत्रक व योजना तयार करतां येईल.

## इतर कांहीं सूचना

याप्रमाणें मुख्यमुख्य सूचना करण्यांत आल्या. याखेरीज कांहीं किरकोळ स्वरूपाच्या सूचनाहि करण्यांत आल्या होत्या. त्यांपैकीं कांहींचा निर्देश पुढें करण्यांत आला आहे.

## मजूरी व किंमती

१ मजूरीचें प्रमाण उत्पादनाशीं निश्चितपणें जोडण्यांत यावें. उत्पादनांत वाढ झाल्याखेरीज मजूरींत वाढ करण्यांत येऊं नये.

२ मजूरी आणि भांडवलावरील नफा यांचा संबंध जोडण्यांत यावा. याकरितां वेजबोर्ड, वेजिस कौन्सिल ॲक्ट (१९४५-४८) याखालील कौन्सिल यांस या बाबतींत चौकशी करून निर्णय देण्याचा अधिकार देण्यांत यावा. यामुळें मजूरीचें प्रमाण उत्पन्नाशीं जोडलें जाईल.

मजूरांकरितां कारखान्यांमध्यें स्पर्धा होऊं नये.

३ राहणीच्या वाढीबरोबर आपोआप मजूरीची वाढ होणें थांबविलें पाहिजे. राष्ट्रीय मजूरीचे दर दीर्घकालीन धोरण आंखून ठरवून देण्यांत यावे. मालक-कामगार लढ्यांत लवादाची पद्धति अंगीकारण्यांत यावी. दोनतृतीयांश मताधिक्याखेरीज संप करण्यांत येऊं नये. 'बंद दुकानाचें' धोरण व पिकेटिंग बंद करण्यांत यावें.








४ ट्रेडयुनियन काँग्रेसनें मजूरांचें पुढारीपण केलें पाहिजे. त्या काँग्रेसनें लोकांस आर्थिक बाजू समजावून दिली पाहिजे. अर्धवट शिकवणीनें गेल्या पन्नास वर्षांत फार बिघाड केला आहे. मालकांनींहि दिसावयास गैरकायदा नसलेले पण वास्तविक गैरकायदा असलेल्या उपायांचा अवलंब करण्याचें सोडून दिलें पाहिजे. दोघांनीं योग्य प्रयत्न केल्यास उत्पादन व त्याबरोबर मजुरी व राहणी यांची वाढ खात्रीनें होत राहील.

५ एकट्या दुकट्या ट्रेडयुनियननें आपल्याच प्रयत्नांनीं मजूरींत वाढ करून घेऊं नये. ट्रेडयुनियन काँग्रेसमार्फत सर्व हालचाली झाल्या पाहिजेत व ती ट्रेडयुनियन्सची पार्लमेंटसभा बनली पाहिजे. वार्षिक उत्पादनांतील वाढ लक्ष्यांत घेऊन मजूरींत वाढ झाली पाहिजे.

६ माल निर्यात केल्यास शेंकडा एक टक्का नफा व इंग्लंडांतच विकल्यास आठ टक्के नफा ही स्थिति बदलली पाहिजे. ऑस्ट्रेलियामध्यें एक इंग्रज मालविक्रय करणारा आढळला तर जर्मन आठ व जपानी तेरा माल खपवे आढळतात. परदेशी माल पाठविण्यापेक्षां देशांतच माल खपविणें सोपें व अधिक फायदेशीर आहे ही इंग्रजी कारखानदारांची वृत्ति घालविली पाहिजे.

७ बँकांच्या व्यवहारावर देखरेख करण्याकरितां काम जलद उरकेल इतकी लहान पण उद्योग, शेती व व्यापार यांतील अनुभवी व अत्यंत सचोटीचे गृहस्थ घेतां येतील इतकी मोठी संख्या असलेला एक बोर्ड नेमावा हा जज्जाप्रमाणें अंतिम हुकमतीचा व चांगल्या वर्तणुकीपर्यंत मुदतीचा असावा व सरकारास त्यास काढतां येऊं नये.

८ स्टॉक एक्सचेंजनें एक राष्ट्रीय बचत फंड किंवा ठेव फंड काढून तो बिगर फायद्यानें चालवावा. यांत एक पौंडापासून पोष्टाच्या तिकिट रूपानें ठेवी घेण्यांत याव्या. यावरील उत्पन्नावर पांचशें पौंडापर्यंत कर नसावा. स्टॉक एक्सचेंजमधील खरेदीवरील स्टँपड्यूटी माफ करून ती एक महिन्याच्या मुदतीमधील विक्रीवर पन्नास टक्के व दोन वर्षांच्या मुदतींत कमी कमी करून माफ करावी. यामुळें सट्टेबाजीस आळा बसेल.

९ बँकांनीं लहान मुदतीच्या ऐवजीं दीर्घ मुदतीचीं कर्जें देण्याकडे कटाक्ष ठेवावा म्हणजे उत्पादनांत व कारखानदारींत वाढ होईल व चलनवाढीस आळा बसेल.

याशिवाय कांहीं किरकोळ सूचनाहि कांहीं लोकांनीं केल्या त्यांमध्यें (१) प्रत्येक पौंडाच्या चेकवर तिकिट लावावें. (२) वैयक्तिक बचत वाढवावी. बचतीवरील २५ पौंडांच्या उत्पन्नास कर माफी द्यावी. (३) मोठमोठ्या धंद्यांतील फुकट जाणाऱ्या मालाचा (स्क्रॅप) अधिक उपयोग करावा. (४) मजूरवर्ग एकाच ठिकाणीं गर्दी करून न राहतां देशांतील निरनिराळया भागांत सहज जाईल असा राहून प्रांतांतील कारखान्यांचें उत्पादन वाढविण्यास अधिक उपयुक्त असा असावा. (५) कारखान्यांस सरकारी मदत बंद करावी व ते आपल्या पायावर उभे राहतील असे करावे. (६) मजूरी व किंमती यांतील वाढ बंद करावी व लोकांनीं या कामीं स्वतः साहाय्य करावें. किंमती वाढल्यानें निर्यात बंद होते. (७) लोकांचे पुढारी व राजकारणी लोकांनीं पुढें येऊन राष्ट्रास वस्तुस्थिति समजावून द्यावी. मजूर व कारखानदार या दोघांनीहि अधिक प्रामाणिकपणा दाखवावा. (८) उद्योगधंद्यांत भांडवल गुंतविण्यास प्राथम्य द्यावें. घरबांधणी वगैरे कामें पुढें ढकलावीं. (९) कॉमनवेल्थमधील राष्ट्रांकडूनच माल खरेदी करावा.

याप्रमाणें इंग्लंडमधील चलनवाढीस आळा कसा घालतां येईल या विषयावर चलनवाढीचीं सामान्य कारणें, सध्यां इंग्लंडमध्यें ती कां झाली आहे व ती आटोक्यांत आणण्याकरितां काय केलें पाहिजे यासंबंधीं निरनिराळया लोकांचीं मतें व










त्यांनीं सुचविलेले उपाय वर सांगितलेले आहेत. चलनवाढीचीं सामान्य कारणें सर्व देशांत एकच असतात. विशिष्ट कालांत कांहीं गोष्टी एखाद्या देशांत विशेष कारणीभूत होतात ही गोष्ट खरी व त्यामुळें त्या त्या देशांत योजावयाच्या उपायांमध्यें थोडा फार फरक होत जाणारा असला तरी एकंदरींत त्यांत बराच सामान्य भाग असणारच या दृष्टीनें भारतापुढेंहि हा चलनवाढीचा प्रश्न आज उपस्थित झालाच आहे. त्या दृष्टीनें वरील विवेचन बरेंच उपयुक्त होईल असें वाटतें.[१]

---

## फायदा काय ?

भूमितीची मांडणी पहिल्या प्रथम युक्लिडनें केली असें सांगतात. युक्लिड हा ग्रीसचा राहणारा. तो ज्या काळांत होऊन गेला त्या काळीं ग्रीस देशांतल्या सर्व शिकलेल्या लोकांचीं डोकीं राजकारणानें भरून गेलेलीं होतीं. किंवा त्यांच्या डोक्यांत राजकारणाचे बटाटे भरले होते असें म्हटलें तरी चालेल. त्यामुळें भूमितीची कदर करणारा प्राणी दुर्मिळच झाला होता. आणि युक्लिड तर भूमितीवर फिदा होता. तथापि आज ज्याप्रमाणें चरख्यावर फिदा झालेल्या एका माणसानें बऱ्याच मुत्सद्दी लोकांना डोकें खाजवावयास लावलें आहे, त्याप्रमाणें युक्लिडनेंहि पुष्कळ राजकारणी लोकांना रेघोट्या काढावयास लाविलें होतें. हररोज युक्लिडच्या घरीं भूमिति शिकावयास आलेल्या लोकांचा फड जमत असे आणि युक्लिड आपले शोध कुशलतेनें समजावून सांगत असे. बरेचसे राजकारणी लोक अशा प्रकारें युक्लिडच्या नादीं लागलेले पाहून एका राजाला वाटलें, "आपणहि जाऊन पहावें, फायदा होईल." तो युक्लिडपाशीं येऊन एक हप्ताभर भूमिति शिकला. शेवटीं त्यानें युक्लिडला विचारलें, "मी आज सात दिवस झाले भूमिती शिकतों. ह्याचा फायदा काय ?" युक्लिड गंभीरपणें आपल्या शिष्याला म्हणाला, "अरे, ह्याला रोजीं चार आणेप्रमाणें सात दिवसांचे पावणे दोन रुपये देऊन टाक पाहूं." नंतर त्या राजाकडे वळून म्हणतो, "तुमचे ह्या हप्त्याचें काम संपलें आहे. तुम्ही उद्यांपासून दुसरीकडे काम बघा." मुत्सद्दी राजा खजील होण्याऐवजीं पावणे दोन रुपये हातांत पडल्यामुळें खुश झाला असेल काय ? आपली मनोवृत्ति ह्या ग्रीक राजासारखी बनली आहे.

—विनोबा

---

१ हा लेख लिहून झाल्यानंतर 'बँक ऑफ इंग्लंड' या ब्रिटिश सरकारी बँकेनें व्याजाचा दर पांच टक्क्यांवरून सात टक्क्यांवर नेल्याचें वृत्त नुकतेंच आलें आहे. हें चलनवाढ रोखण्याच्या बाबतींत पहिलें पाऊल आहे. इतका मोठा व्याजाचा दर आजपर्यंत कधींच आकारण्यांत आला नव्हता. या गोष्टीचा इंग्लंडमधील चलनवाढीस आळा बसण्याच्या कामीं उपयोग होईलच पण भारतासहि यापुढें इंग्लंडकडून कर्ज काढणें परवडणार नाहीं हें उघड आहे. भारताच्या इंग्लंडमधील सुवर्ण-गंगाजळीवरील व्याजाचा दरहि याबरोबर वाढणार आहे किंवा काय हें अद्यापि स्पष्ट झालें नाहीं. भारतानें या गोष्टीकडे अधिक काळजीपूर्वक लक्ष्य देणें आवश्यक आहे.



अनुक्रमणिका






श्री. जिनेंद्र नाईक

# बुद्धिवाद आणि ईश्वर

'नवभारता'च्या गेल्या कांहीं अंकांतून बुद्धिवाद आणि ईश्वर याबद्दल चर्चा चालू आहे. त्या अनुरोधानें पण थोड्याशा निराळ्या दृष्टिकोणांतून मीहि माझे 'बुद्धिवाद आणि ईश्वर' या विषयावर कांहीं विचार मांडूं इच्छितों.

**जुन्या जमान्याचें मानसशास्त्र**

प्रा. नारायणशास्त्री द्रविड ( ऑक्टो. १९५७ ) यांच्या एकंदर म्हणण्याचा रोख असा दिसतो कीं, बुद्धीला अगम्य किंवा अनाकलनीय अशा कांहीं शक्तीचें किंवा वस्तूचें अस्तित्व असूं शकतें. प्रत्यक्ष किंवा परोक्ष ज्ञान मिळविण्याचें पंचेंद्रियें हेंच कांहीं अंतिम साधन नव्हे. पंचेंद्रियान्वयें मिळणाऱ्या अनुभवाव्यतिरिक्त स्वतंत्ररीत्या मानवीमनामध्यें श्रद्धा या नांवाचा स्तर आहे. या श्रद्धेची घडण किंवा त्याचें स्वरूप हें पंचेंद्रियाद्वारें मिळणाऱ्या अनुभवावर कसल्याहि प्रकारें अवलंबून रहात नाहीं. "ही श्रद्धा ईश्वरी सत्तेसंबंधीची म्हणजेच ईश्वराच्या अनंत ज्ञान व शक्ति आदि गुणांबद्दलची व त्यावर अधिष्ठित असलेल्या विश्वाच्या आध्यात्मिकतेबद्दलची असते." श्रद्धेवरचा स्तर स्वानुभवाचा, त्यानंतरचा शास्त्रीय गृहीत कृत्यांचा, नंतर रूढी किंवा संकेत, व शेवटीं अंधविश्वासाचा.

मनाच्या या पांच स्तराच्या कल्पनेनें प्रा. द्रविड यांनीं स्पष्टच लिहावयाचें म्हणजे, ईश्वरासंबंधीच्या नवभारतमधील त्या अगोदरच्या लेखामुळें जें एक बऱ्यापैकीं मत कमावलें होतें तें एकदम गमावलें! प्रा. द्रविडांच्या या पांच स्तराच्या श्रद्धाळू कल्पनेवर टीका करायची म्हणजे कुठल्या मुद्द्याला वगळून करायची हेंच मुळीं टीकाकाराला समजत नाहीं! मनाच्या कप्प्याचें मानसशास्त्र हें मानसशास्त्राच्या इतिहासांत जुन्या जमान्याचा मामला होऊन बसलेलें आहे. हल्लीं मानसशास्त्र हें आत्मा ( Soul ) आणि मन ( Mind ) यांच्या कचाट्यांतून बाहेर येऊन माणसाच्या प्रत्यक्ष आचरणाशीं (activities or behaviour ) संबंधित झालेलें आहे. माणसाच्या मनाची घडण ही त्याला जन्मत:च कप्प्याकप्प्यानें मिळालेली ईश्वरदत्त देणगी नसून वंशपरंपरेनें त्याला चढलेलें रूप (hereditary elements), आणि तो ज्या सामाजिक जगांत जगत असतो त्यांतल्या आचारविचाराचा त्याच्यावर झालेला परिणाम हे मिळून ती होत असते. तिच्यामध्यें ईश्वरी श्रद्धेचा अंश असतो कीं नाहीं या प्रश्नाचें उत्तर तो मनुष्य आहे कीं नाहीं यामध्यें नसून तो ज्या कुटुंबांत, समाजांत वाढत असतो त्यांतल्या विचारांचा परिणाम त्याच्यावर कितपत आणि कसा होतो, त्याला अनुभव कशाकशा प्रकारचे आलेले असतात, त्या अनुभवांची संगति लावण्याची त्याच्या मनाची प्रवृत्ति कशी आहे, या साऱ्या गोष्टींमध्यें आहे. शास्त्रीय गृहीत कृत्यांच्या स्तराचा त्याच्या मनाच्या घडणीमध्यें नंबर लागतोच कीं नाहीं, रूढी आणि संकेत यांचा क्रम तिसरा लागतो कीं पहिला लागतो, अंधविश्वासाचा किंवा अंधश्रद्धेचा क्रम शेवटचा लागतो कीं पहिला, या प्रश्नांचीं उत्तरें माणसाला मन आहे कीं नाहीं यांत नसून तो कशा प्रकारच्या वातावरणांत जगत आणि वाढत असतो यांत आहेत. प्रा. द्रविड हे तत्त्वज्ञानाचे प्राध्यापक आहेत; त्यांच्यावर जर निरनिराळ्या रानटी जातींचा अभ्यास करण्याची पाळी आली असती आणि

तत्त्वज्ञानाऐवजीं मानवजाति-शास्त्राचे जर ते प्राध्यापक असते, तर कदाचित् अंधश्रद्धेचा क्रम पहिला लागला असता. रूढी आणि संकेताचा निश्चितच देवाच्यावर लागला असता आणि शास्त्रीय गृहित कृत्यांच्या स्तराचा पत्ताच लागला नसता; कारण त्या बिचाऱ्या रानटी टोळ्यांना यातुविद्येशिवाय ( Magic ) कुठल्या शास्त्राच्या अस्तित्वाची कल्पनाच नाहीं ! मग त्यांच्या गृहित कृत्यांचा तर प्रश्न दूरचाच !

हे वरील विचार 'नवभारता'मध्यें चालू असलेल्या ईश्वराबद्दलच्या चर्चेच्या अनुरोधानें लिहिलेले आहेत. मलाहि स्वतंत्र रीत्या ' बुद्धिवाद आणि ईश्वर ' या विषयावर कांहीं विचार व्यक्त करावयाचे आहेत.

## बुद्धीचें स्वरूप व कार्य

बुद्धिवाद म्हणजे काय किंवा बुद्धिवादाचें निश्चित स्वरूप कोणतें या विवेचनांत न शिरतां असें म्हणतां येईल कीं, बुद्धि ही भावना आणि श्रद्धा याहून वेगळी आहे. बुद्धि ( Intelligence ) ही माणसाची स्वतःची आणि इतर कुठल्याहि प्राण्यांना विशेष न लाभलेली अशी वस्तू आहे. तिचें खरें स्वरूप हें भावना आणि श्रद्धा याहून फक्त निराळें असण्यांतच नसून माणसाच्या सुखानें जगण्यासाठीं धडपडण्याच्या क्रियेमध्यें इतराहून जास्त हितकारक मदत करण्यामध्यें आहे. आपल्या लाखो वर्षांच्या धडपडण्यानंतर चतुष्पाद प्राण्याचा ( Ape ) मनुष्य होण्यामध्यें आणि अशा माणसांचा एक सुखी समाज निर्माण करण्यामध्यें भावना किंवा श्रद्धेपेक्षां बुद्धीचें कार्य निश्चितच अधिक आहे.

केवळ वरील ऐतिहासिक कारणासाठींच बुद्धि ही भावना किंवा अंधश्रद्धा यापेक्षां श्रेष्ठ नसून तिचें श्रेष्ठत्व हें स्वयंभू स्वरूपांतच आहे असेंहि म्हणतां येईल. ( अंधश्रद्धेच्या ऐवजीं श्रद्धाहि म्हणतां येईल; कारण, श्रद्धा आणि अंधश्रद्धा यामधला फरक त्यांच्या स्वरूपामध्यें-त्या कशाबद्दल आहेत—नसून त्या किती बळकट आहेत यामध्यें आहे. सर्व परिस्थितींत सर्व प्रकारच्या अनुभवांची संगति एकाच स्व-मनाची खात्री झालेल्या गोष्टीवरून लावण्याच्या पद्धतीला अंधश्रद्धा म्हणतां येईल; त्याच्या अगोदरची पायरी म्हणजे श्रद्धा. ती बुद्धि-विरोधी असत नाहीं ). माणसांना निरनिराळ्या प्रकारचे अनुभव येतात. कांहीं अनुभव भावना रुजविण्यामध्यें किंवा बळकट करण्यामध्यें, कांहीं श्रद्धा रुजविण्यामध्यें किंवा बळकट करण्यामध्यें, तर कांहीं विचारांना चालना देण्यामध्यें शेवट पावतात. त्या अनुभवांची स्व-वागणूक ठरविण्याच्या दृष्टीनें संगति लावणें जरूर असतें. स्व-वागणूक ठरविण्याबद्दल कांहीं अनुभवांना जादा व कांहींना कमी महत्त्व देणें अपरिहार्य ठरतें. या अनुभवांच्या महत्त्व मिळविण्यांच्या चढाओढीमध्यें बुद्धि, भावना व श्रद्धा या तिन्हीहि परिणामकर्त्या म्हणून पुढें येतात. पूर्वीपैकीं कांहीं अनुभवांचा आपल्या भावनेवर जर प्रखर परिणाम झालेला असेल तर त्या भावना उसळून पुढें येतात. आपल्या वागणुकीचा कल इतर सर्व अनुभवांना, विचारांना किंवा श्रद्धांना बाजूला सारून आपल्याच बाजूनें करून घेण्यासाठीं त्या भावनाप्रधान अनुभवांची धडपड असते. याचप्रमाणें जेव्हां दोन श्रद्धांमध्यें, श्रद्धा व विचार किंवा भावनेमध्यें, प्रभुत्वासाठीं धडपड सुरू असते, तेव्हां जादा बळकट असलेली व खोलवर रुजलेली श्रद्धा वागणुकीवर स्वामित्व मिळविण्यासाठीं पुढें सरसावते. त्याचप्रमाणें जेव्हां बुद्धि आणि भावना, किंवा बुद्धि आणि श्रद्धा यांच्यामध्यें अनुभवांच्या संगतीच्या दृष्टीनें चढाओढ सुरू होते तेव्हां कांहीं विचार परिणामासाठीं पुढें धावतात. तेव्हां मनुष्यापुढें मूलभूत प्रश्न असा निर्माण होतो कीं, अनुभवांची आपल्या आणि आपल्या समाजाच्या सुखाच्या व हिताच्या दृष्टीनें संगति लावण्याचें व त्या बरहुकूम आपली वागणूक करविण्याचें काम मुख्यतः बुद्धिवर, भावनेवर, कीं











श्रद्धेवर सोपवावें ? त्याच्या स्वतःच्या आयुष्यांतल्या यशस्वी प्रसंगाच्या आठवणी, दुसऱ्या यशस्वी लोकांचे अनुभव, माणसाला हेंच सांगतात कीं, भावना आणि श्रद्धेपेक्षां बुद्धीच पूर्व अनुभवांच्यानुसार त्याच्या वागणुकीचा कल ठरविण्याच्या दृष्टीनें निश्चितच अत्यंत उपयोगी ठरते.

बुद्धीचा उपयोग मानवी आयुष्यांत याहून अधिक आहे. फक्त एका व्यक्तीच्या आयुष्यांतच हितकारक म्हणून ती पुढें येत नसून व्यक्ति-समूहाच्या आयुष्यांत, समाजाच्या, राष्ट्राच्या आयुष्यांत, ज्या ज्या वेळेला भावना आणि श्रद्धा यांशीं तिची झटापट असते त्या त्या वेळीं जर निर्णय तिच्या विजयानें लागला तर तो व्यक्ति-समूह, समाज किंवा राष्ट्र हे विजयी होत, सुधारत आणि सुखी होत गेलेले दिसतात. तेव्हां बुद्धि ही माणसाच्या सुखासाठीं धडपडण्याच्या क्रियेमध्यें त्याच्या व्यक्तिगत आणि सामाजिक आयुष्यांत भावना किंवा श्रद्धा यापेक्षां माणसाला जास्त उपयोगी ठरते आणि ठरलेली आहे.

## निर्णय घेण्याचें बुद्धीचें सामर्थ्य

वरील विचार थोड्याशा निराळ्या पद्धतीनें मांडतां येतील. व्यक्तीच्या आयुष्यांत पुष्कळ वेळां त्याच्या बुद्धीचा, भावनेचा आणि श्रद्धेचा झगडा होत असतो. त्याची बुद्धि त्याला सांगते, तूं याप्रमाणें वाग म्हणजे तुझें क्षणिकच नव्हे तर कायमचेंहि हित होईल. भावना म्हणते, तूं असेंच वाग; श्रद्धा त्याचा धरलेला पायच सोडायला तयार होत नाहीं. तेव्हां त्या व्यक्तीपुढें **निर्णय घेण्याचा** प्रश्न येतो. बहुतेक वेळां हा निर्णय त्याच्या क्षणिक हिताच्याच नव्हे तर भावी हिताच्या दृष्टीनेंहि घेणें त्याला जरूर असतें. असा निर्णय घेण्याचें सामर्थ्य बुद्धि, भावना आणि श्रद्धा यांपैकीं कशामध्यें आहे ? या प्रश्नाचें एकच, आणि फक्त एकच उत्तर असें आहे कीं, फक्त बुद्धिमध्यें. कारण भविष्यकाळाची कल्पना किंवा विचार करण्याचें सामर्थ्य फक्त बुद्धीशिवाय कशामध्येंहि नाहीं. भावनेमध्यें नाहीं आणि श्रद्धेमध्येंहि नाहीं. भावना आणि श्रद्धा या फक्त वर्तमानकाळाशींच संबंधित असतात. भावना फारतर भूतकाळाबद्दल वाटते. (Some times we feel past emotions). श्रद्धेमध्यें तितकेंहि गुण नसतात. श्रद्धा ही बुद्धीच्या मदतीशिवाय भूतकाळांतहि वावरूं शकत नाहीं. फक्त तिचें वर्तमान स्वरूप ठरविण्यामध्यें भूतकाळाचा बराच हात असतो इतकेंच. पण भूत आणि वर्तमान यांची तुलना करून निर्णयाला येण्याचें सामर्थ्य तिच्यामध्यें नसतें. हाच प्रकार बऱ्याच अंशीं भावनेलाहि लागू पडतो. वर्तमानकाळची भावना ही सुद्धां कांहीं अंशीं भूतकाळाच्या अनुभवांचीच वाढलेली किंवा कमी झालेली आवृत्ति असते. पण एक निश्चित कीं, वर्तमान काळच्या भावनेमध्यें, श्रद्धेप्रमाणेंच, बुद्धीच्या मदतीशिवाय तिच्या सध्यांच्या अनुभवाचा अंश त्यामध्यें किती आहे व पूर्वींच्या अनुभवाचा किती आहे हें ठरविण्याचें सामर्थ्य नसतें. बुद्धीचें वर्तमानस्वरूप भूतकाळाशीं जरी निगडीत असलें तरी वर्तमान आणि भूतकाळाचे अंश निवडून काढण्याचें तीमध्यें सामर्थ्य आहे. हें झालें वर्तमान आणि भूतकाळासंबंधीं. भविष्यकाळासंबंधीं वर्तमान आणि भूत अनुभवाशीं तुलना करून सारासार विचार करून, निर्णय घेण्याचें सामर्थ्य फक्त बुद्धिमध्येंच आहे. हा निर्णय मानवाच्या प्रगतीच्याच नव्हे तर अस्तित्वाच्या दृष्टीनेंहि अत्यंत महत्त्वाचा आहे. हा जर निर्णय घेण्याचें सामर्थ्य मनुष्याजवळ नसतें तर जनावराचा (Ape) मनुष्य झाला असता कीं नाहीं याहि बद्दल प्रस्तुत लेखकाला शंका आहे.

वरील विवेचनाचा रोख बुद्धि ही भावना व श्रद्धा यापेक्षां श्रेष्ठ आहे व मनुष्याला त्याच्या सुखासाठीं धडपडण्याच्या प्रक्रियेमध्यें तीच अंतिम उपकारक ठरते, हें ठरविण्याकडे आहे. याचा अर्थ असा नव्हे कीं, फक्त बुद्धिच माणसाला सुखी बनवूं शकते, आणि भावना आणि श्रद्धा त्या दृष्टीनें निरुपयोगी किंवा







अनहितकारक आहेत. वरील विवेचनाचा मथितार्थ इतकाच कीं, जेव्हां बुद्धि, भावना व श्रद्धा यांमध्यें निर्णयासाठीं झगडा लागलेला असतो तेव्हां वर्तमान, भूत, व भविष्य याचा सारासार विचार करून निर्णय घेण्याचें सामर्थ्य फक्त बुद्धीमध्येंच आहे. भावना किंवा श्रद्धा यामध्यें तसें सामर्थ्य नसल्यामुळें अशा वेळीं बुद्धीचीच कांस धरणें माणसाला जास्त योग्य होईल.

## भावनेचें व श्रद्धेचें स्थान

आतां प्रश्न असा उपस्थित होतो कीं, जर भावना आणि श्रद्धा माणसाच्या आयुष्यांत सुखाच्या दृष्टीनें निरुपयोगी नसतील तर त्यांचें त्याच्या आयुष्यांत स्थान आहे कीं नाहीं ? असेल तर कोणतें ? त्यांना स्थान आहे हें तर निश्चितच. कारण, आपण जरी त्यांना बाजूला डावलण्याचें ठरविलें किंवा उखडून काढण्याचें ठरविलें तरी तें शक्य नाहीं. तें शक्य नाहीं म्हणून इष्टहि नाहीं. त्यांचा आपल्या वागणुकीवर थोड्याबहुत प्रमाणांत नेहमीच परिणाम होत राहणार. फ्रॉइडसारखा मानसशास्त्रज्ञ असें सांगतो कीं, त्यांचा हात आपले आचार आणि विचार घडविण्यामध्यें बराच आहे. मनुष्य हा जसा बुद्धिवादी प्राणी आहे त्याचप्रमाणें भावनामयहि आहे, श्रद्धाळूहि आहे. तेव्हां माणसाच्या आयुष्यांत त्याच्या सुखाच्या दृष्टीनें अशा भावनेचें व श्रद्धेचें स्थान कोणतें ?

( अ ) भावनेच्या बाबतींत असें म्हणतां येईल कीं, माणसाच्या विचारामध्यें आणि आचारामध्यें एक प्रकारची बुद्धिनियंत्रित नैसर्गिकता आणि सहजता येण्याच्या दृष्टीनें आणि गुंतागुंती (Complexities) टाळण्याच्या दृष्टीनें तिनें नेहमीं शक्यतों व्यक्त ( expressed ) रहावें. याचा अर्थ असा नव्हे कीं, तिनें आपला वरचष्मा माणसाच्या वर्तणुकीमध्यें ठेवावा. याचा अर्थ इतकाच कीं, बुद्धि-असंबंध असें जें तिचें नैसर्गिक स्थान माणसाच्या प्रकृतींत आहे त्याचा सुयोग्य स्फोट झाल्याशिवाय खऱ्या अर्थानें मानवी जीवन हें बुद्धिनियंत्रित राहूंच शकत नाहीं. ज्याला फ्रॉइडची विचारसरणी म्हणतां येईल तीच येथें थोडक्यांत व्यक्त करण्याचा प्रयत्न केलेला आहे. हें आहे भावनेचें स्वयं-सिद्ध स्थान. तिचें जें दुसरें स्थान कीं ज्याला बुद्धिश्रद्धा-मदतीचें म्हणतां येईल तेंहि बरेंच महत्त्वाचें आहे.

(ब) आपण वर पाहिलें कीं, ज्या वेळीं बुद्धि-श्रद्धा —भावना यांमध्यें झटापट होईल त्या वेळीं निर्णय हा बुद्धि-नियंत्रित असावा. अशा निर्णयाची अम्मलबजावणी करणें, किंवा झटापटीविना स्वतंत्रपणें बुद्धीनें दिलेल्या निर्णयाची मानवी आचरणामध्यें अम्मलबजावणी करणें, हेंहि स्वतःच्या व समाजाच्या सुखाच्या दृष्टीनें माणसाला अत्यंत आवश्यक आहे. असा बुद्धि –नियंत्रित निर्णय माणसाच्या आयुष्यांत राबविण्याच्या दृष्टीनें बळकटी आणणें हें श्रद्धेचें व बुद्धीचें दुसरें महत्त्वाचें कार्य म्हणतां येईल. ( येथें चर्चा करतों तितक्या त्या तिन्ही स्वतंत्र सुटसुटीत व असंबंध नाहींत. तरी पण सततच्या प्रयत्नानें आणि संवयीनें त्यांना तशी सहजता आणणें माणसाला शक्य आहे ).

## बुद्धिवादी कोणास म्हणावें ?

जीवनांत माणसाला एखाद्या समस्येवर निर्णय घेणें जितकें महत्त्वाचें ठरतें, तितकेंच त्या निर्णयाप्रमाणें वागण्याचें ठरतें. त्याच्या वागण्यामध्यें ज्याप्रमाणें बुद्धीचा डोळसपणा असावा लागतो त्याचप्रमाणें भावनेची ओढ असावी लागते. श्रद्धेची बळकटी असावी लागते. ओलाव्याविना ज्याप्रमाणें झाडाला हिरवळ फुलत नाहीं त्याचप्रमाणें भावनेशिवाय माणसाचें हास्य उमटत नाहीं, रडूं उसळत नाहीं. दुसऱ्याबद्दल त्याला आपुलकी वाटत नाहीं. त्यांच्याहि सुखदुःखाचा विचार आपल्या वागणुकीमध्यें व्यक्त करण्याची इच्छा निर्माण होत नाहीं; तसें सामर्थ्य येत नाहीं. अशा इच्छेविना आणि ओलाव्याविना बुद्धिवादी मनुष्य म्हणजे एक रूक्ष वाळवंट भासतो. निव्वळ स्वतःच्याच स्वार्थासाठीं

घडपडणारा आणि त्या धडपडीचा बुद्धीच्या साहाय्यानें, युक्ति-प्रयुक्तीनें, समर्थन करणारा तो एक प्राणी ठरतो. निव्वळ भावनेवर जगणाऱ्या वेड्या पिराप्रमाणें हाहि समाजाला निरुपयोगी ठरतो. खरें म्हणजे तो बुद्धिवादी नसतोच. जो बुद्धिवादी मनुष्य त्याच्या आतांपर्यंतच्या घडवणुकीमध्यें, त्या क्षणापर्यंतच्या जगवण्यामध्यें, समाजाची, त्याच्या सारख्याच जिवंत असणाऱ्या असंख्य मानवी प्राण्यांची, जी मदत होते, जे ऋण होतात, ते विसरतो तो बुद्धिवादी असूंच शकत नाहीं. कारण सत्याशीं सर्वस्वी विसंगत अशी एक कल्पना तो उराशीं बाळगून असतो कीं, तो एक समाजाहून अलग असणारा, आणि म्हणून समाजाशीं असंबंधित, बेफिकीर राहूं इच्छिणारा प्राणी आहे. समाजाशीं असंबंध अशी त्यांच्या आयुष्यांतली कुठलीहि अवस्था असूं शकत नाहीं.

पण आम्हां मानवांच्या दुर्दैवानें आम्ही या आमच्या व्यक्तिगत आणि सामूहिक सुखासाठीं आवश्यक असलेल्या मार्गाचा अनेक वेळां अवलंब करीत नाहीं. जेव्हां बुद्धि, भावना आणि श्रद्धा यामध्यें झगडा निर्माण होतो तेव्हां भावनेनें वाहून जाऊन किंवा श्रद्धेंत रुतून बसून त्याप्रमाणें वागण्याचें ठरवितो; कांहीं वेळां बुद्धीच्या निर्णयानुसार वागण्याचें ठरवितो, पण तो ठराव स्मृतीच्या रकान्यांत तसाच जपून ठेवतो. त्या ठरावाच्या अम्मलबजावणीसाठीं भावनेचा ओलावा आणि श्रद्धेची बळकटी यांचीच बहुधा जरूरी असते; त्या हव्या त्या प्रमाणांत नसल्यामुळें, किंवा खऱ्या अर्थानें आमची वर्तणूक बुद्धिवादी नसल्यामुळें, या इहलोकीच्या सुंदरशा स्वर्गाला आम्ही नर्कस्वरूप प्राप्त करून देतों.

## धर्माची आवश्यकता ?

आपण आतांपर्यंत बुद्धिवादाच्या अनुरोधानें विवेचन केलें. त्याच विचाराच्या पार्श्वभूमीवर ईश्वराबद्दल आणि धर्माच्या मानवी सुख आणि प्रगतीच्या दृष्टीनें असलेल्या आवश्यकतेबद्दल विचार करूं.

धर्माच्या कल्पनेमध्यें मुख्यतः खालील श्रद्धांचा समावेश होतो--

(१) ईश्वर म्हणून एक सर्वज्ञ, सर्वव्यापी, आणि अतिसमर्थ अशी या चराचर सृष्टीच्या कार्याचें नियंत्रण करणारी शक्ति आहे. तो कृपाळू आहे.

(२) माणसाच्या अस्तित्वाच्या आणि सुखदुःखाच्या बुडाशीं त्याच शक्तीची कृपा-अवकृपा आहे.

(३) म्हणून माणसाच्या आयुष्याचें सर्वव्यापी आणि एकमेव महत्त्वाचें जीवितकार्य अशा शक्तीची आराधना करून व त्याला शक्यतों प्रसन्न करून आपलें सुख प्राप्त करून घेणें हेंच आहे. यामागें अशीहि श्रद्धा असते कीं, मनुष्याच्या ईश्वरकृपेबद्दल ज्या समजुती आहेत त्याचप्रकारें कार्य केल्यानें ईश्वर प्रसन्न होत असतो. उदाहरणार्थ, ईश्वराच्या अस्तित्वावर श्रद्धा न ठेवतां, किंवा त्याच्याबद्दल अनादर दाखवून, मानवाच्या ऐहिक सुखासाठीं एखाद्यानें आयुष्यभर जरी धडपड केली तरी त्या कृत्यांना ईश्वरी कृपा मिळणार नाहीं.

(४) या ईश्वरीकृपेबद्दल ज्ञान देणारी आणि मार्ग दर्शविणारी धर्म या नांवाची एक ईश्वरनिर्मित संस्था आहे. या संस्थेनें माणसाच्या विचार आणि आचारासाठीं कांहीं तत्त्वें सांगितलेलीं आहेत. त्या तत्त्वाप्रमाणेंच विचार आणि त्या बरहुकूमच आचार केल्याशिवाय ईश्वरप्रसन्नता प्राप्त होत नाहीं.

(५) कांहीं वेळां हेंहि कारण पुढें केलें जातें कीं, धर्म हाच साऱ्या मानवी नीतिसंस्थेच्या बुडाशीं आहे. तेव्हां धर्मव्यतिरिक्त माणसामाणसामधले व्यवहारसुद्धां नीतिमय होणें शक्य नाहीं.

आणखीहि कांहीं श्रद्धा ईश्वरी कल्पनेच्या बुडाशीं आहेत, पण वरीलच मुख्य असल्यामुळें त्यांच्या अनुरोधानेंच मुख्यत: विचार करूं.

(१) व (२) ईश्वराच्या अस्तित्वाबद्दल आणि स्वरूपाबद्दल ईश्वरभक्तांचें म्हणणें असें आहे








कीं, तो सर्वस्वी श्रद्धेचा प्रश्न आहे. बुद्धीचा मार्ग त्या प्रांतांत शिरण्याचा नव्हे. वादासाठीं या गोष्टी क्षणभर मान्य करूनसुद्धां प्रस्तुत लेखक असें विचारूं इच्छितो कीं, सर्वच धर्मांनीं ईश्वराच्या अस्तित्वाची आणि स्वरूपाची कल्पना मान्य केली आहे काय ? जैन हा जर धर्म मानायला ईश्वरभक्त तयार असतील तर जैनांना ईश्वर कल्पना मान्य आहे काय ?

दुसरें म्हणजे, ईश्वराच्या स्वरूपाबद्दलच्या श्रद्धा सर्वच ईश्वरभक्तांच्या सारख्याच असतात काय ? प्रस्तुत लेखकाच्या वाचनांत, आणि अवलोकनांतहि अशी एक मागासलेली जमात आहे कीं ज्या मधील लोक ईश्वर म्हणजे एक भयप्रद शक्ति असें मानतात आणि त्याच्या प्रसन्नतेसाठीं निरनिराळ्या प्राण्यांच्या रक्ताची आवश्यकता असते असें समजून त्याप्रमाणें आचरतात. आतां ईश्वरश्रद्धाळू असें म्हणतील कीं, या लोकांची ईश्वराबद्दलची जी श्रद्धा आहे ती चुकीची आहे. ईश्वराच्या स्वरूपाचें ज्ञान त्यांना झालेलेंच नाहीं. प्रस्तुत लेखक नम्रपणें असें विचारूं इच्छितो कीं, हा शोध त्यांना लागला कसा ? जर ईश्वराचें अस्तित्व आणि स्वरूप सर्वस्वी श्रद्धेचाच प्रश्न असेल आणि बुद्धीला त्या श्रद्धेची तपासणी करण्याचा अधिकार नसेल, तर दोन सर्वस्वी भिन्न असलेल्या व्यक्तींच्या श्रद्धेची तुलना एखाद्या व्यक्तीच्या सर्वस्वी श्रद्धेच्या साहाय्यानें कशी करतां येईल ? किंबहुना, तुलना करून निष्कर्ष काढण्याची श्रद्धेमध्यें कुंवत तरी आहे काय ? बुद्धीच्या मदतीशिवाय या गोष्टी कशा शक्य आहेत ? तेव्हां, निरनिराळ्या लोकांच्या ईश्वराबद्दलच्या भिन्न भिन्न कल्पना तशाच घेऊन त्यांचेंच समर्थन करणें हेंच ईश्वरभक्तांचें एकमेव कार्य ठरत नाहीं काय ?

( ३ ) ईश्वर आहे हें जरी श्रद्धेनें माणसाला मानतां येत असलें तरी त्या ईश्वराची मनोरचना, मनोव्यापार, हे मानवी श्रद्धेनें ठरवितांच येत नाहींत. श्रद्धा ही स्वतंत्रपणें कल्पना करायला किंवा मानवी अनुभवाच्या जोरावर तशीच श्रद्धास्थानाबद्दल अनुमानें काढायला असमर्थ आहे. बुद्धीच्या साहाय्याशिवाय ती कांहीं करूंच शकत नाहीं. बरें, बुद्धीच्या साहाय्यानें अंदाज बांधायचे म्हणजे मानवी व्यवहार तरी इतका स्पष्ट, सहज, विना गुंतागुंतीचा आहे काय ? अ हा जर खरोखरच उदार मनाचा, स्वतःबद्दल विशेष विचार न करणारा, परहित नेहमीं दृष्टिपुढें ठेवणारा, सज्जन मनुष्य असेल, आणि ब हि तशाच प्रकारचा असेल, पण ब चें प्रामाणिकपणें अ च्या अस्तित्वाबद्दलहि प्रतिकूल मत असेल, किंवा त्याच्या कार्याबद्दल त्याच्या मनांत अनादर असेल, तर अ च्या मनांत ब बद्दल अवकृपेची भावना खरोखरच उद्भवते काय ? अ असें म्हणूं शकतो काय कीं, मी इतका मोठा असूनसुद्धां माझ्या अस्तित्वाबद्दल आणि कर्तृत्वाबद्दल जी व्यक्ति शंका घेऊं शकते ती चांगली असणेंच शक्य नाहीं ? असा जर अ चा निर्णय असेल तर ब पेक्षां अ श्रेष्ठ कसा ?

ईश्वराच्या या कृपाळू अस्तित्वाबद्दल ईश्वर-भक्तांचें असेंहि म्हणणें असण्याची शक्यता आहे कीं, ती एक आमची फक्त श्रद्धाच नसून कांहीं पुण्यात्म्यांचा तसा अनुभवहि आहे. कांहीं लोकांना ईश्वरी साक्षात्कार होऊन त्याचें त्यांना प्रत्यक्ष दर्शन घडलेलें आहे. असें प्रत्यक्ष ज्ञान असलेल्या, आणि आमचा विश्वास कमावलेल्या, व्यक्तींच्या माहितीवर विश्वासून आम्हीहि तशीच श्रद्धा ठेवलेली आहे.

असें म्हणण्या अगोदर ईश्वरभक्त कळत न कळत हें मान्य करतो कीं, ईश्वरी श्रद्धेमागें मानवी अनुभवाची जोड आहे. हा अनुभव मानवाला त्याच्या पंचेंद्रियांच्या साहाय्यानें मिळालेला आहे. पण मिळालेल्या अनुभवाची संगति लावण्याचें काम श्रद्धेचें कीं बुद्धीचें ? कीं विशेष चिकित्सेशिवाय दुसऱ्यांना मिळालेल्या अनुभवांच्या खरेपणाचा अंधपणानें ( कारण स्वतःला तो मिळालेला नसतो ) स्वीकार

करावा असें त्यांचें म्हणणें आहे ? तसें असेल तर देवाबद्दलच अशी सवलतीची दृष्टि कां ? भुताबद्दल कां नको ? दुसऱ्यांच्या ज्ञान-अज्ञानाबद्दल, साऱ्याच मानवी व्यवहाराबद्दल कां नको ?

( ४ ) धर्माच्या ईश्वर-निर्मिततेबद्दल इतकेंच सांगतां येईल कीं, धर्म ही ईश्वर-निर्मित संस्था नसून मानवानें आपल्या सामाजिक जीवनांत तिची निर्मिती केलेली आहे. हा इतिहासाचा दाखला खूपशा धार्मिक लोकांनाहि मान्य असल्याचें दिसतें.

हीच वस्तुस्थिति धार्मिक तत्त्वांच्या बदलते-पणाचीहि आहे. प्रत्येक धर्माच्या इतिहासांत कांहीं सुधारक ( Reformist ) चळवळी झालेल्या आहेत आणि धर्माच्या मूळ पुस्तकांतल्या तत्त्वांची उजळणीहि कांहीं प्रमाणांत कांहीं ठिकाणी करण्यांत आलेली आहे; व बऱ्याच ठिकाणीं तसें करण्याची धार्मिक लोकांना जरूरी भासत आहे. उदा.— कुराणांतल्या स्त्री, गुलाम, लग्न, घटस्फोट याबद्दलच्या तत्त्वांबाबत.

(५) धर्म हाच साऱ्या नीतिसंस्थेच्या बुडाशीं आहे या म्हणण्यामध्यें वस्तुनिष्ठता तितकीशीं नाहीं. कांहीं निधर्मी लोकहि नीतिमान असल्याचे दिसतात; तर बरेचसे धार्मिक लोक अनीतिमय आचरण करीत असल्याचे दिसतात; बाह्य कर्मकांडांना धार्मिक आचरणांत स्थान असल्यामुळें व अनीतीची वागणूक विशिष्ट कर्मिष्ठ आचरणानें इहजन्मींच धुवून निघते अशी धर्माची प्रत्यक्ष वा अप्रत्यक्ष शिकवण असल्यामुळें नीतिपेक्षां अनीतीच धार्मिक लोकांमुळें बोकाळते कीं काय अशी एक प्रामाणिक समजूत स्थिर होऊं पहात आहे. यावर कांही लोक कर्मिष्ठपणा हें धर्माचें खरें स्वरूप नाहीं असा आक्षेप घेतील. पण तें धर्माचें एक अंग आहे हें त्यांना नाकार-तांच येत नाहीं. अन् जर तें नाकारतां येत नाहीं तर त्या अंगाचा फायदा घेऊन धार्मिक लोकांमध्यें चाललेली अनीति कशी नाकारतां येईल ?

या विचारसरणीमध्यें दुसरा एक मोठा दोष हा आहे कीं, ती नीतिसंस्थेचें स्वरूप सर्वच काळीं स्थिर व न बदलणारें मानते. पण माणसाचा तसा अनु-भव नाहीं. उदा.— ज्या वेळेला भिकाऱ्यांचा फार मोठा प्रश्नहि नव्हता ( त्यांच्या कमी संख्येमुळेंहि असेल कदाचित ) व त्या प्रश्नाचा विशेष अभ्यास झालेला नव्हता, तेव्हां ( हिंदू, बौद्ध, जैन ) धर्मांची अशी शिकवणूक होती कीं, ( अन् आजहि आहे ) भिकाऱ्यांना धार्मिक लोकांनीं अन्न द्यावें; म्हणजे पुण्यलाभ होईल. आतां पूर्ण अभ्यासानंतर अशी समजूत झालेली आहे कीं, भिकाऱ्यांना अशा व्यक्तिगत मिळालेल्या मदतीनें त्यांचा प्रश्न सुटत नाहीं. तेव्हां समाजानें किंवा राष्ट्रानें त्यांना त्यांच्या कुवतीप्रमाणें काम देण्याची व्यवस्था करावी. स्वत:च्या श्रमावर त्यांना जगायला हवें.

हें वरील नीतीचें विवेचन एका साध्या प्रश्नाला अनुसरून केलेलें आहे. मार्क्सवादाच्या आगमना-नंतर श्रीमंती म्हणजे काय, श्रीमंतांनीं दिलेल्या देणगींतून त्यांना पुण्यलाभ व्हावा काय, इत्यादि ज्या नीतीच्या नव्या कल्पना आलेल्या आहेत त्यांचा विचारसुद्धां नीति-तत्त्वांचा अस्थिरपणाच दर्शवित नाहीं काय ?

### ऐहिक प्रगतींतील अडथळा

प्रत्यक्ष सुबुद्ध धार्मिक लोकांचें आचरण व करणी मानवाच्या इहलोकीच्या प्रगतीमध्यें ( कारण, नीति-तत्त्वें हीं मानवाच्या इहलोकीच्याच अस्तित्वाशीं संबंधित आहेत अशी प्रस्तुत लेखकाची समजूत आहे ) कशी अडथळा निर्माण करते हें आज घडत असलेल्या एका घटनेच्या उदाहरणानें दर्शवितां येईल. कोल्हापूर जिल्ह्यांत बाहुबली नांवाचें जैनांचें एक धार्मिक क्षेत्र आहे. तें क्षेत्र सुशिक्षित आणि सुबुद्ध जैन कार्यकर्त्यांच्या मार्गदर्शनाखालीं आहे. तेथील जे मुख्य जैन साधू त्यांचें शिक्षण बी. ए. पर्यंत झालेलें आहे. बऱ्याच कार्य-

कर्त्यांचें शिक्षण बी. ए., एम्. ए. पर्यंत झालेलें आहे. अशा कार्यकर्त्यांनीं आणि साधूनें तिथें एका नव्या कार्याचा आरंभ केलेला आहे. एक जवळ जवळ २५ ते २८ फूट उंच देवाची दगडी मूर्ति उभारण्याचें नवें कार्य त्यांनीं अंगिकारलें आहे. या मूर्तिप्रस्थापनेसाठीं एकूण खर्च (मला जरी निश्चित आंकडा माहीत नसला तरी माझ्या माहिती-प्रमाणें) साधारणतः दहा ते बारा लक्ष रु. पर्यंत किंवा त्याहून अधिकच येणार आहे. प्रस्तुत लेखकाचा जन्महि एका जैनधर्मीय कुटुंबांत झाल्यामुळें बालपणा-पासून निरनिराळया ठिकाणचीं बरीचशीं जैन मंदिरें पहाण्याचा त्याला इच्छेविना योग आलेला आहे. तेव्हां त्याच्या माहितीप्रमाणें आणि कल्पनेप्रमाणें लोकसंख्येच्या मानानें कुठल्याहि धर्मापेक्षां (फार तर निरनिराळया रानटी लोकांच्या टोळयांचे छोटे दगडी देव सोडले तर) जैनधर्मीय लोकांच्या देवमूर्ति जास्त असाव्यात. त्यांचें प्रमाण कदाचित् प्रत्येक १०० जैनांच्या मागें एक तरी पडावें असा अंदाज आहे. कारण प्रत्येक जैन मंदिरांत शेकडोंनीं मूर्ती असतात. इतकें सारें विवेचन करण्याचें कारण एकच कीं, आज आत्मिक उन्नतीसाठीं आणि धर्माकडे लक्ष केंद्रित करण्यासाठीं एखाद्या दगडी मूर्तीची जरूरी आहेच अशा अवस्थेमध्यें जैन धर्म नाहीं. पण आपल्या राष्ट्रविकासाच्या निरनिराळया कार्यासाठीं, पंचवार्षिक योजनेच्या पूर्तीसाठीं, लोकांना धनधान्य आणि कामधंदा मिळवून देण्यासाठीं, त्यांच्या समृद्धी-साठीं, भारताला पैशाची अत्यंत जरूरी आहे. अशा-वेळीं हा पैसा जरूर नसलेल्या दगडी मूर्तिमध्यें लाखोंनीं खर्च करणें आणि अत्यंत जरूरी असलेलीं कार्यें पैशाविना तशींच खोळंबून ठेवण्यासारखें आच-रण करणें म्हणजे शुद्ध अनीतिमय (Immoral) आचरण करणें असें प्रस्तुत लेखकाचें स्पष्ट मत आहे. धर्म अशा नव्या नीतिमूल्यांना जन्म देण्याला समर्थ आहे काय ?

## धर्माचें दौर्बल्य

हें सारें विवेचन, धर्म हा माणसांना नव्या परि-स्थितींत हव्या असलेल्या नव्या-नीतिमूल्यांना, त्याच्या प्राकृतिक बुद्धि-विरोधामुळें आणि परलोकी वृत्तीमुळें, जन्म देण्यास असमर्थ आहे, हें दाखविण्यासाठीं आहे. जोपर्यंत मनुष्य हाच साऱ्या नीतिमूल्यांचा केंद्र-बिंदू होत नाहीं, जोपर्यंत माणसाचें इहलोकी-चेंच सुख (कारण इहलोकींच तो जगत असतो) हाच नीतिसंस्थेचा आणि नव्या समाज-व्यवस्थेचा पाया होऊं शकत नाहीं, तोपर्यंत माणसाची सुखा-साठीं चाललेली धडपड ही बऱ्याच प्रमाणांत निरु-पयोगी आणि अडथळा निर्माण करणारी ठरत आहे. जोपर्यंत मानव हाच साऱ्या मानवी मूल्यांचा मान-दंड होत नाहीं तोपर्यंत माणसाची प्रगति म्हणजे एक वाट चुकलेली वाटचाल ठरत आहे. पण ही वाटचाल आम्ही केव्हां थांबवणार ? नवी वाटचाल सुरूं करणें माणसाला शक्यच नाहीं काय ?

---












प्रा. अ. भि. शाह

# ईश्वर आहे काय?

'नवभारत' मासिकाच्या मे १९५७, ऑगस्ट १९५७ व ऑक्टोबर १९५७ या तीन अंकांत प्रसिद्ध झालेले श्री. नारायणशास्त्री द्रविड आणि श्री. स. बा. कुलकर्णी यांचे 'ईश्वर आहे काय?' या विषयावरील लेख वाचले. श्री. द्रविड यांच्या मूळ लेखावर श्री. कुलकर्णी यांनीं केलेली टीका विज्ञान व गणित या विषयांचा विद्यार्थी या नात्यानें मला मान्य आहे. या टीकेवर श्री. द्रविड यांनीं केलेल्या प्रति-टीकेंतून तर्क व शिष्टसंकेत या दोन्हीं दृष्टीनें कांही मुद्दे उपस्थित होतात. येथें केवळ तीनचार मुद्द्यांवरच थोडेसें लिहितों.

## अनाठायीं मुद्दा

( १ ) श्री. द्रविड यांनीं केलेलें निगमनाचें विवेचन ( **नवभारत**, ऑक्टोबर १९५७, पा. ४८-४९ ) अनाठायीं आहे. श्री. कुलकर्णी यांनीं घेतलेल्या आक्षेपाशीं त्याचा संबंध नाहीं. निगमनात्मक निष्कर्ष काढण्याच्या अनेक मार्गांपैकीं सिलॉजिझम् (Syllogism) केवळ एक मार्ग आहे, इतर मार्गहि आहेत, हें सत्य ॲरिस्टॉटल् व त्याच्या अनुयायांना माहीत नव्हतें हें खरें आहे. परंतु याचा अर्थ असा नव्हे कीं, सिलॉजिझमूच्या मदतीनें काढलेले निष्कर्ष तार्किक दृष्ट्या अग्राह्य ( invalid ) ठरतात. आधुनिक तर्कशास्त्राच्या संस्थापकानें जुन्या तर्कशास्त्राच्या इतर उणीवाहि दाखविल्या आहेत. तरीहि तर्कशास्त्राचा मुख्य उपयोग श्री. कुलकर्णी यांनीं म्हटल्याप्रमाणें ग्राह्य निष्कर्ष काढण्याचें एकमेव शास्त्र म्हणून राहतोच. श्री. द्रविड यांनीं उल्लेख केलेल्या पुस्तकांतच रसेल् म्हणतो कीं, " Symbolic logic is essentially concerned with inference in general." (Bertrand Russel, *Principles of Mathematics, p. 11* ).

## तर्कशास्त्र आणि ईश्वर

नवीन ज्ञान कसें निर्माण होतें हा तर्कशास्त्राचा विषय नाहीं. तो प्रश्न मानसशास्त्राचा आहे. हान्स् राइशन्बाक् (Hans Reichenbach) आपल्या " The Rise of Scientific Philosophy " या पुस्तकांत ज्याला संशोधनाचा संदर्भ ( Context of discovery ) म्हणतो तो तर्कशास्त्राचा विषय होऊं शकत नाहीं. तर्कशास्त्राचा विषय आहे तो निकषणाचा संदर्भ ( context of verification ). आपण ज्याला ज्ञान म्हणतों तें नेहमींच परोक्ष असतें. प्रत्यक्ष येणाऱ्या अनुभवाच्या घटकांना आपण इंद्रियसंवेदना ( sense-data ) म्हणतों. विविध प्रकारच्या इंद्रियसंवेदनांना अनुरूप संकल्पना ( concepts ) निर्माण करून त्यांच्यामध्यें आपण जे संबंध लावतों त्यांना आपण अभ्युपगमात्मक नियम ( hypothetical laws ) म्हटलें, तर ज्ञान म्हणजे तर्क व अनुभव यांच्या दुहेरी निकषावर उतरणारे नियम*. या क्रियेमध्यें ज्ञानमीमांसेचे कांहीं सिद्धान्त ( principles of epistemology ) आपण गृहीत

---

* पहा : " In no realm ...... is knowledge but an aggregate of individual data, of statements concerning a here and now. Knowledge is concerned with the way these data mutually condition each other and how they are interconnected. " – Ernst Cassirer, *Determinism and Indeterminism in Modern Physics*, p. 36.

तत्त्वें म्हणून घेतों, हें खरें आहे. परंतु हे सिद्धान्त स्वैरीत्या ( arbitrarily ) घेतां येत नाहींत. ते व्यक्तिनिरपेक्ष असावे लागतात व ज्ञानाचा आशय म्हणून जे नियम आपण मांडतों त्यांची उपपत्ति ( तर्कदृष्ट्या ) सुगम करणें व त्यांच्यामध्यें संवादित्व आणणें, हें त्या सिद्धान्ताचें खरें कर्तव्य असतें.

ज्ञानाचें हें स्वरूप व तर्कशास्त्राचें कार्य लक्षांत घेतलें कीं, ईश्वराच्या अस्तित्वाचा प्रश्न स्पष्ट होतो. ईश्वर आहे असा 'अनुभव' येऊन ईश्वराचें अस्तित्व सिद्ध होत नाहीं. नास्तिकवादाचा अर्थ श्री. द्रविड सांगतात. तसा घेतला व नास्तिकवादी तत्त्वप्रणालींचें खंडन केलें तरी कार्यसिद्धि होत नाहीं. कारण, कोठल्याहि वस्तूच्या अस्तित्वाबद्दल होकारात्मक विधान ( assertive proposition ) करावयाचें असेल तर त्या विधानाला येणाऱ्या आक्षेपांचें खंडन केल्यानें त्याची सत्यता सिद्ध होऊं शकत नाहीं. तर तें विधान मनुष्याला येणाऱ्या अनुभवांची संगति लावणाऱ्या विविध संकल्पना व त्यांचे आंतरसंबंध ( inter-relationships ) यामध्यें कोठें बसतें, हें प्रथम दाखविलें पाहिजे असें केल्यानंतर निर्माण होणाऱ्या नियमांचें निकषण ( verification ) वैज्ञानिक पद्धतीनें कसें होऊं शकेल, हें दाखविलें पाहिजे. म्हणजे, या नियमांतून तर्कशास्त्राच्या मदतीनें काढलेले निष्कर्ष आपल्या अनुभवांत कोठें तरी प्रतिबिंबित झाले पाहिजेत. † श्री. द्रविड किंवा इतर कोणी ईश्वरवाद्यानें हें कार्य अजून तरी केलेलें नाहीं. इतर क्षेत्रांत सर्व व्यक्तींना येणाऱ्या अनुभव व त्यांची लावलेली व्यक्तिनिरपेक्ष संगति यांच्याकडे दुर्लक्ष करून, विशिष्ट प्रकारच्या व्यक्तींना विशिष्ट प्रकारच्या परिस्थितींत येणाऱ्या अनुभवाला एका विशिष्ट प्रकारानें अर्थ लावून जर ईश्वराच्या अस्तित्वाची सिद्धता म्हणून घ्यावयाचें असेल, तर गोष्ट वेगळी. परंतु असें केल्यास ईश्वर हा बुद्धीचा विषय रहात नाहीं, इतकेंच नव्हे तर तो श्रद्धेचाहि रहात नाहीं; तो अंधश्रद्धेचा विषय म्हणूनच राहूं शकतो. कारण श्रद्धेला तर्क आणि अनुभव यांच्या निकषावर तपासून घ्यावी लागते. तसें केलें नाहीं तर ती अंधश्रद्धा ठरते. ईश्वराच्या अस्तित्वावरची श्रद्धा ही अशीच अंधश्रद्धा आहे.

काटेकोरपणानें तर्कशुद्ध विधान करावयाचें असेल तर केव्हांतरी, कोणीतरी ईश्वराचें अस्तित्व वैज्ञानिक व तार्किक दृष्ट्या सिद्ध करून दाखवील हें अगदींच अशक्य नाहीं, असें म्हटलें पाहिजे. परंतु एडिंग्टन म्हणतो त्याप्रमाणें, "The off chance that a future generation may discover a significance in our utterances is scarcely an excuse for making meaningless noises." (A. S. Eddington, *The Mathematical Theory of Relativity, p. 8* ).

## विज्ञानें अभ्यासण्याची गरज

श्री. द्रविड म्हणतात कीं, " मानवजीवनाचाच सर्वांत मूलभूत जर कोणता आधार असेल तर तो ईश्वरी सत्तेवरील विश्वास. हा प्रत्येक माणसाच्या— तो अस्तिक असो वा नसो—मनांत खोल वसत असतो. " हें विधान अतिव्याप्ति व मानवजातीच्या इतिहासाचें अज्ञान या दोन दोषानें दूषित आहे.

शेवटीं एक मुद्दा घेऊन माझें म्हणणें संपवितों. श्री. द्रविड म्हणतात कीं, "प्रकाशाचें विकिरण (Quanta) च्या रूपानें होतें किंवा ( Waves ) लहरींच्या रूपानें यावर कांहीं एकपक्षीय निश्चय

† पहा : " A theory which is not refutable by any conceiveable event is non-scientific. Irrefutability is not a virtue of a theory ( as people often think ) but a vice ! " — Karl Popper, in *British philosophy in the Mid-Century, p. 159.*

करतां न आल्यामुळें आधुनिक शास्त्रज्ञ (Wavicle) हा शब्द यासंबंधीं वापरूं लागले आहेत. " या विधानांतील चूक दाखविण्याकरितां एक स्वतंत्र लेख लिहावा लागेल. तसा लेख लिहावयाचा हा प्रसंग नव्हे. येथें फक्त एका कृतिशील वैज्ञानिकाचें मत देऊन थांबतों.

" Some authors have used the formulation that one and the same object of atomic physics can be regarded as a particle or as a wave, according to the specific experiment involved. Other authors have introduced the belief that this object is a kind of hybrid entity that offers two aspects, and some have even given to it a composite name like 'wavicle' ... actually all these formulations are misleading. " ( Philipp Frank, *Philosophy of Science*, p. 226 )

फ्रान्कच्या या विधानाचा अर्थ समजून घेण्याकरितां आधुनिक पदार्थविज्ञानाचा आशय समजावून घेतला पाहिजे. तोपर्यंत विद्यापीठीय ( academic ) तत्त्वज्ञानानें केलेली मल्लिनाथी बरोबर आहे कीं चूक आहे, हें ठरवितां येणार नाहीं. दुर्दैवानें ज्या विज्ञानांच्या पायावर तत्त्वज्ञानाची उभारणी झाली पाहिजे तीं विज्ञानें आपल्या तत्त्वज्ञानाच्या विद्यार्थ्यांना शिकवलीं जात नाहींत. उपनिषदें न वाचतां शांकर-भाष्य वाचण्यासारखी ही परिस्थिति आहे; नव्हे, त्यापेक्षांहि वाईट आहे. विज्ञानाचीं उपनिषदें व त्यावरचें शांकरभाष्य न वाचतां विज्ञानाचें राधाकृष्णन् वाचून संतोष मानण्याची परंपरा आपल्या देशांत आहे.

प्रा. गोवर्धन पारीख

# निकिता क्रुश्चेव्ह

निकिताचें बालपण युक्रेनमधील कुर्स्क जिल्ह्यांतील कालिनोव्हका या लहानशा खेड्यांत गेलें. सर्जी क्रुश्च याचा हा मुलगा. क्रुश्च हे मूळचे झापोरोग कोसॅक. सतराव्या शतकांत त्यांना युक्रेनमध्यें हद्दपार केलें, तेव्हांपासून त्यांचें वास्तव्य युक्रेनमध्येंच होतें. एकोणिसाव्या शतकांत पहिल्या निकोलसच्या काळांत त्यांनीं आपल्या नांवापुढें ' इव्ह ' प्रत्यय जोडून त्याचें रशियन रूपांतर केलें. ते रशियन भाषा बोलत. पण उच्चार मात्र युक्रेनियन वळणाचे. खोदकामांत ते निष्णात समजले जात; आणि उत्तम आहार व भरपूर मद्यपान याविषयींहि त्यांची ख्याती होती. त्यांना शोभण्यासारखाच निकिता हा त्यांचा वंशज आहे.

सर्जीचा संसार म्हणजे बायको व दहा मुलें. आणि संपत्ति म्हणजे वडिलार्जित थोडीशी जमीन, दोन गायी, दोन शेळ्या व थोडीशीं डुकरें. शेतीचें काम बायको व मुलेंच पहात. खार्कोव्हकडे जाण्याच्या हमरस्त्यावर त्याची एक लोहारकामाची भट्टी होती. निकिताला शेती वा गुराख्याचें काम आवडे; पण बापाच्या कडक शिस्तीमुळें अकरा वर्षांचा होतांच तो लोहारकामांत पडला. मोकळ्या वेळांत तो जंगलांत भटके, मासे पकडण्यास जाई, कोल्ह्यांच्या शिकारीसाठीं जाळीं लावी, माळावर गाणीं म्हणत हिंडे किंवा आपल्या पाव्यावर युक्रेनियन लोकगीताचे सूर काढून स्नेह्यासोबत्यांची करमणूक करी. शाळेंत तो फारसा गेलाच नाहीं. खेड्यांतील पाद्र्यानें चालविलेली शाळा ती. लिहिणें-वाचणें, मामुली गणित व बायबलच्या जुन्या व नव्या करारावर आधारलेला ' पवित्र इतिहास ' हे तिथले विषय. यामुळें निकिता 'अडाणी'च राहिला असें सांगतात. तारुण्यांत प्रवेश करूं लागतांच गांवातल्या मुलीबाळींकडे मात्र तो लक्ष पुरवीत असे. आणि त्यांनाहि तें आवडायचें !

सर्जीच्या दुकानाची हळुहळु भरभराट होत होत त्याचें एक लहानसें वर्कशॉपच बनलें; आणि पुढें बापाच्या आजारामुळें त्याची सारी जबाबदारी निकिताकडेच आली. अनेकजण त्याला घण मारतांना पहात अन् त्याच्या कामाची वाहवा करीत. खेड्यांत वेळोवेळीं फेरीवाले कांहीं ' चटोर ' पुस्तकें आणीत आणि सर्वजण तीं उत्साहानें वाचीत; निकिता मात्र त्यांना सहसा स्पर्शहि करायचा नाहीं. नाहीं म्हणायला एकादें पुस्तक त्यानें घेतलेंच तर दोन-तीन पानापलीकडे प्रगति व्हायची नाहीं. एकदां मात्र तो वाचनांत गढून गेलेला दिसला. रुबॅकिनचें निसर्ग, इतिहास व भूगर्भशास्त्रावरील पुस्तक होतें तें. अभ्यासाची असली आवड खेड्यांतल्या वातावरणांत कशी पुरी होणार ?

एकदां मासे धरतांना निकिता झारच्या पहारेकऱ्याच्या हातीं सांपडला. राखीव जागा होती ती. हातपाय बांधून व थोडासा चोप देऊन त्यानें निकिताला पोलिसाच्या हवालीं केलें. पोलिसानें त्याची होडी, जाळें वगैरे जप्त करून त्याला हंटरनें झोडपून काढलें. या तरुण झापोरोग कोसॅकचा सामाजिक अन्याय व झारचे अधिकारी यांचा हा पहिलाच अनुभव ! त्याच्या जीवनाला येथेंच कलाटणी मिळाली. खेड्यांत सर्वांनाच हा प्रकार कळला होता. निकिता त्यामुळें जवळ जवळ दिसेनासाच झाला. शरमेमुळें तो हंटरच त्याच्या डोळ्यांपुढें








सतत नाचत होता. झारच्या झोटिंगशाहीचेंच तें प्रतीक होतें. ती उखडून टाकण्याचे विचार त्याच्या डोक्यांत थैमान घालूं लागले. बापाच्या मृत्यूनंतर त्याचा धंदा निकितानें पुढें चालवावा अशी आईची इच्छा. पण निकिताला तर त्या खेडयांतील घृणास्पद वातावरणाचा पुरता उबग आलेला. त्यामुळें आईचें न ऐकतां तो कामधंदा मिळविण्याच्या निमित्तानें खार्कोव्ह येथें निघून गेला.

खार्कोव्ह येथें त्याला टर्नरचें काम मिळालें. त्याचा मुक्काम नातेवाइकांकडेच होता. त्याचे चुलत भाऊ रेल्वेच्या वर्कशॉपमध्यें काम करीत व कामगार चळवळींत भाग घेत. " पॉप्युलिस्ट " व मार्क्सवादी यांच्यांत त्याकाळीं चुरस होती. येथेंच निकिताला वाचनाची गोडी लागली. फांशी गेलेल्या क्रांतिकारकाविषयीं सहानुभूति व्यक्त करण्यासाठीं भरलेल्या एका कामगारांच्या सभेंत भाषण केल्यामुळें तो लवकरच पोलिसांच्या डोळयावर आला. आणि खार्कोव्ह सोडून त्याला करेन येथें जावें लागलें. तेथूनहि पुढें तो निसटला व मरियपोल, यासिनोव्हताया इत्यादि गांवांतील कारखान्यांतून त्यानें कामें केलीं. याच काळांत एकदां त्यानें कांहीं कामगारांच्या साहाय्यानें ज्यूंवर हल्ला करण्यास प्रवृत्त झालेल्या एका गटाला उधळून लावल्याची कथा प्रसिद्ध आहे. युद्धाच्या आरंभीं तो समाजवादी बनला. सोशालिस्ट पक्ष त्या काळांत बेकायदेशीर होते. त्यांना आर्थिक मदत मिळावी म्हणून रशियन कामगार " ऋण सहाय्यक निधि " काढीत. राजकीय जीवनांतील त्याचा मार्गदर्शक म्हणजे त्याचा चुलतभाऊ व्हसिया क्रुश्चेव्ह हा होय. १९१८ सालच्या आरंभीं एका निधीचा व्हसिया चिटणीस व निकिता त्याचा सहाय्यक म्हणून निवडले गेले. युद्धाच्या आरंभीच्या काळांत निकितानें कामगार आंदोलनांत बराच भाग घेतला. १९१७ च्या क्रांतीच्या वेळीं तो लुगान्स्क सोव्हिएटचा सभासद निवडला गेला. त्यानंतर खार्कोव्ह येथें जर्मन सैन्याचा त्यानें यशस्वी प्रतिकार केल्याचें प्रसिद्ध आहे. तथापि याच काळांत तो मनमुराद खाणें, पिणें व तरुण मुलींबरोबर भटकणें यांतहि दंग असे. यामुळें शेवटीं तो क्रांतिकार्यांत कितपत सामील होणार हा एक प्रश्नच होता. पण या संशयाचें लवकरच निराकरण झालें. आणि १९१८ च्या एप्रिल महिन्यांत त्यानें बोल्शेविक पक्षाच्या सभासदत्वासाठीं अर्ज केला; व लवकरच तो पक्षांत सामील झाला.

## पक्षांतील राजकीय जीवनास प्रारंभ

डॉनेट्झमधील कामगारांच्या लष्करी तुकडीचा प्रमुख म्हणून रुमानियन सरहद्दीवर त्याची प्रथम नेमणूक झाली. हें काम रुचेना म्हणून त्यानें शेतीविषयक शिक्षणासाठीं मॉस्कोस जाण्याची परवानगी मागितली. तथापि तशी परवानगी मिळण्याऐवजीं कुर्स्क येथील शेतकी विभागाचा प्रमुख म्हणून त्याची नेमणूक झाली. हें काम त्यानें उत्कृष्टपणें पार पाडल्यामुळें वरिष्ठ अधिकारी खुष झाले. आणि त्यांतून कामाचा अहवाल देण्यासाठीं मॉस्को येथें गेला असतांना लेनिनशीं प्रत्यक्ष परिचय होण्याची त्याला संधी लाभली. तथापि तो यादवीचा काळ असल्यानें एका वर्षाच्या आंतच त्याला खार्कोव्ह येथें लष्करी कामगिरीसाठीं जावें लागलें. खार्कोव्हच्या लढ्यांत त्यानें बजावलेल्या मौलिक कामगिरीमुळें तो पुढें आला. लालसेनेचा प्रमुख ट्राट्स्की यानें स्वतः त्याला पदक देऊन त्याचा गौरव केला.

तथापि निकिताची शिकण्याची इच्छा अजून अतृप्तच होती. ती पूर्ण होण्याचा योग लवकरच आला आणि खार्कोव्ह येथील कृषक् विद्यालयांत तो दाखल झाला. येथेंच त्याचें १९२२ सालीं त्याच्याबरोबरच शिकत असलेल्या सुरकोव्हा नांवाच्या मुलीशीं लग्न झालें. तथापि त्यामुळें त्याच्या अध्ययनांत मुळींच खंड पडला नाहीं. हुषार विद्यार्थी म्हणून निकिता नांवाजला गेला आणि सोव्हिएट



अनुक्रमणिका

राजकारणाचा प्रवाह संथपणें चालू राहता तर शेतीच्या क्षेत्रांतील तो एक मोठा तज्ज्ञ म्हणून पुढें आला असता. तथापि याच सुमारास ट्राट्स्की व स्टॅलीन यांच्यांतील सत्ताकलहास सुरुवात झाली; आणि सारे विद्यार्थी तिकडे ओढले गेले. १९२४ सालीं युक्रेनियन पक्षाचा सरचिटणीस म्हणून कॅगानोविच् खार्कोव्ह येथें आला असतां सारे विद्यार्थी मोठ्या हिरिरीनें ट्राट्स्कीची बाजू घेत असल्याचें दृश्य त्याला अनेकवार पहावें लागलें; याला अपवाद फक्त एकच होता. तो म्हणजे निकिता क्रुश्चेव्ह हा होय. विद्यार्थ्यांच्या एका चर्चेंत सर्व विद्यार्थी विरुद्ध असतांना स्टॅलीनच्या धोरणाला पाठिंबा देणारा ठराव निकितानें मोठ्या धिटाईनें पुढें मांडला; आणि विरोधक करीत असलेल्या गोंधळाला न जुमानतां त्याचें समर्थन केलें. निकिताचें भाषण अत्यंत प्रभावी ठरलें. आणि सभा संपतांना ठरावाला कित्येक विद्यार्थ्यांनीं अनुकूल मत दिलें. कॅगानोविच्चें निकिताकडे साहजिकच लक्ष गेलें. आणि निकिता पक्षाच्या मध्यवर्ती कमिटीचा प्रचारक नेमला गेला.

## प्रभावी प्रचारक

निकिता प्रचारकार्य अत्यंत प्रभावी रीतीनें करीत असे. केवळ कामगारांच्याच नव्हे तर पंडितांच्याहि सभा त्यानें जिंकल्या. "मी डॉनेट्झ्चा एक का म गा र आहे" अशा प्रकारें भाषणाला सुरुवात होई, आणि मार्क्स–एंगेल्स–लेनिन यांच्या लेखनाच्या आधारें व जोमदार वक्तृत्वाच्या साहाय्यानें "एका राष्ट्रांत समाजवाद स्थापन करण्याची इष्टता" श्रोत्यांच्या गळीं उतरविली जाई. खार्कोव्हमध्यें अशा प्रकारच्या सभा जिंकून राजकीय वातावरण त्यानें बहुतांशीं बदलून टाकलें. कॅगानोविच् अर्थातच संतुष्ट होता; आणि लवकरच मध्यवर्ती समितीच्या प्रचार विभागाचा दुय्यम प्रमुख म्हणून त्याची नेमणूक झाली.

परंतु त्याच सुमारास परिस्थिति बदलली. कॅगानोविच्ला परत मॉस्को येथें बोलावण्यांत आलें; आणि त्याच्याऐवजीं स्क्रिप्निक्ची नेमणूक झाली. नवा सरचिटणीस हा "युक्रेनीकरणाच्या" धोरणाचा कट्टर पुरस्कर्ता होता. युक्रेनमधील–विशेषतः कुर्स्कच्या शासकीय विभागांतील–लोक युक्रेनी भाषा बोलत नसत; त्यांची भाषा म्हणजे युक्रेनी व रशियन यांचें एक चमत्कारिक मिश्रण. निकितालाहि रशियन उत्तम येई; परंतु युक्रेनी मात्र तो बरोबर बोलूं शकत नसे. स्क्रिप्निक्च्या कारकीर्दींत ही गोष्ट खपण्यासारखी नव्हती. एकदां स्क्रिप्निक्नें प्रचार विभागाला भेट दिली आणि युक्रेनींत एक लांबलचक निवेदन निकिताला सांगितलें व निकिता रशियनमध्यें उत्तर देऊं लागतांच तो उसळून म्हणाला "प्रचार विभागाच्या प्रमुखाला युक्रेनी भाषा देखील धड बोलतां येऊं नये ही शरमेची गोष्ट आहे. विशेष म्हणजे तूं तर युक्रेनियन आहेस. तुला आपली भाषा शिकावीसें वाटत नाहीं काय ? तूं म्हणजे रशियनचा भाडोत्री वकीलच दिसतोस; दुसरें काय ?" या प्रकाराचें पुढें १९३४ मध्यें निकितानें उट्टें काढलें आणि "पोलंडचा एजंट" म्हणून स्क्रिप्निक्ची संभावना करून मध्यवर्ती समितींतून त्याची हकालपट्टी केली. पण १९२८ मध्यें मात्र निकिताला वरील अपमान मुकाट्यानें सहन करावा लागला. तथापि तो लवकरच "कीव्हच्या औद्योगिक विद्यापीठां"त आपणांस अध्ययन करावयाचें आहे या सबबीवर, हकालपट्टी होण्याच्या आंतच, प्रचार विभाग व मध्यवर्ती समितींतून बाहेर पडला. युक्रेनीकरणाच्या धोरणाची तीव्रता वाढूं लागल्यामुळें त्याला विद्यापीठांतहि फार काळ रहातां आलें नाहीं. १९२९ च्या अखेरीस मॉस्को येथील औद्योगिक विद्यापीठांत अध्ययनाच्या निमित्तानें पक्षाच्या परवानगीनें तो दाखल झाला.








### पक्षांतील सत्ताकलहांत

औद्योगिक विद्यापीठांत जाण्यापूर्वी निकितानें कॅगानोविच्ची गांठ घेतली. ट्रॉट्स्कीविरुद्ध लढा आतां संपला होता. आणि रायकॉव्ह, बुखारिन, टॉम्स्की, पायटॅकॉव्ह, सोकोल्निकॉव्ह इत्यादि 'उजव्या' गटांतील नेत्यांशीं लढा सुरू झाला होता. या लढ्यांत निकितासारखीं मार्क्सवादाची तात्त्विक भूमिका अवगत असलेलीं, कामगार कुटुंबांतलीं, उत्तम वक्तृत्व करूं शकणारीं व विश्वासाई माणसें कॅगानोविच्ला हवीं होतीं. यामुळें औद्योगिक विद्यापीठांतील पक्षशाखेचा (सेल्) चिटणीस म्हणून निकिताची लगेंच नेमणूक झाली. वर उल्लेख केलेल्या गुणांबरोबरच, पक्षाचें नेतृत्व व जनता, दोहोंशींहि चांगले संबंध ठेवण्याचें कौशल्य निकिता दाखवी. आणि स्टॅलिनविषयीं तर त्याच्या मनांत कमालीचा पूज्यभाव होता. प्रत्येक भाषणांत तो व्यक्त झाल्यावांचून रहात नसे.

कॅगानोविच्हि त्याची पक्षांतील अधिकारारूढ नेत्यांशीं ओळख करून देण्याची एकहि संधी दवडीत नसे. कुबिशेव, ओरजॉनकिझ्, मिकोयान, कालिनिन्, किरॉव्ह, व्होरोशिलॉव्ह इत्यादि नेत्यांशीं त्याचा परिचय झाला. लवकरच मॉस्कोमधील एका विभागाच्या पक्षसमितीचा तो चिटणीस नेमला गेला. त्याच्या नेतृत्वाखालीं पक्षाचें शुद्धीकरण करण्याच्या मोहिमेस आरंभ होऊन सुमारें ५०० पक्षसभासदांना गुप्त पोलिसांच्या हवाली करण्यांत आलें व यथावकाश त्यांचा निकाल लावला गेला. भावी हत्याकांडाचा हा आरंभच होता. स्टालीनची पत्नी नद्येझ्दा हिनें १९३२ सालीं उद्वेगानें आत्महत्याहि केली. तथापि हें हत्याकांड मात्र त्यामुळें टळूं शकलें नाहीं. १९३३ मध्यें स्टालीननें कॅगानोविच्ची बहिण रोझा इच्याशीं लग्न केलें. रोझा ही अत्यंत सुंदर व हुषार असून मित्रमंडळी एकत्र जमवून मजेंत वेळ घालविण्याची तिला विशेष आवड असे. यामुळें स्टालीनच्या सवयीहि बदलल्या आणि त्याच्या मॉस्कोजवळच असलेल्या एका ग्रामीण घरांत त्याची निकटवर्ती स्नेही-मंडळी आठवड्यांतून एकवेळ जमूं लागली. या पार्टीतच निकिताहि दिसूं लागला. अर्थात् रोझामुळेंच तो उत्तम नृत्य करी; गोड गाणीं म्हणें; व कथा सांगूं लागला म्हणजे खुद्द स्टालीनलाहि हंसवी.

१९३४ च्या अखेरीस तो मॉस्को पक्षाचा द्वितीय चिटणीस म्हणून नेमला गेला. त्याचवर्षी १ डिसेंबरला किरॉव्हचा खून झाला. खुनाचें कारण जरी खाजगी सूड हेंच असलें तरी स्टालीनला त्यामुळें रायकॉव्ह, बुखारिन्, व टॉम्स्की यांच्यावर हल्ला करण्याची व विरोधकांचा पुनः एकवार निःपात करण्याची उत्तम संधी चालून आल्यासारखें वाटलें. तथापि 'पॉलिट्ब्यूरो'ला तसें करणें इष्ट वाटलें नाहीं. मोलोटॉव्ह व कॅगानोविच् यांच्याखेरीज स्टालीनच्या धोरणाला कोणाचाहि पाठिंबा मिळाला नाहीं. यामुळें या दोघांना, इतरांची हकालपट्टी करणें शक्य व्हावें यासाठीं चटकन् बढती देण्यास लायक अशा पक्षसभासदांची यादी करण्याची स्टालीननें सूचना केली. त्या यादींत मेलेंकॉव्ह, क्रुश्चेव्ह, येझॉव्ह, बेरिया हीं नांवें अग्रभागीं होतीं.

### "पॉलिट्ब्यूरोंत" प्रवेश

१९३५ च्या डिसेंबर महिन्यांत निकिताची मॉस्को पक्षाचा प्रथम चिटणीस, व प्रादेशिक पक्षाचा द्वितीय चिटणीस म्हणून नेमणूक झाली. अशा प्रकारें तो स्टालीनच्या मेव्हण्याचा, कॅगानोविच्चा, प्रत्यक्ष मदतनीस बनला. मॉस्कोंतील भूमिगत रेल्वे बांधण्याच्या कार्यांत त्यानें विशेष लक्ष घालण्यास सुरुवात केली. अशासारख्या कार्यांत महत्त्वाच्या साधनसामुग्रीची उधळपट्टी करण्याऐवजीं जनतेच्या अधिक निकडीच्या गरजा पुरविण्यासाठीं तिचा विनियोग करणें अधिक योग्य होईल असा एक आक्षेप होता;








परंतु स्टॅलिननें तो धुडकावून लावला. हें काम पहात असतांनाच त्यावेळीं मॉस्कोच्या महापौरस्थानीं असलेल्या बुल्गॅनिनशीं निकिताची मैत्री जमली. दोघेहि मद्यपारखी ! त्यामुळें सायंकाळीं एकत्र जमून गुफ्तगू करण्याचा त्यांचा नित्याचा क्रमच बनला. आणखीहि एक कारण होतें. बुल्गॅनिनची बहीण नाद्या ही रोझा कॅगानोविच्ची चांगली मैत्रीण होती. यामुळें निकिता नाद्याकडेहि लक्ष पुरवूं लागला. नाद्या व रोझा यांच्या प्रयत्नांनींच बुल्गॅनिनला भराभर बढती मिळत गेली होती. आणि बुल्गॅनिन व क्रुश्चेव्ह यांचा स्नेह जुळण्यालाहि या दोघींची मैत्रीच बव्हंशानें जबाबदार होती. आणि १९३७ मध्यें म्हणजे मोठ्या हत्याकांडाच्या वर्षीच स्टॅलिनच्या सूचनेवरून निकिताची पॉलिट्ब्यूरोचा दुय्यम सभासद म्हणून निवडणूक झाली.

उत्तर कॉकेशसमधील विरोधकांचा बंदोबस्त करण्यासाठीं निकिताची प्रथम रवानगी झाली. आणि ही कामगिरी त्यानें इतक्या उत्कृष्टपणें बजावली कीं, पॉलिट्ब्यूरोच्या दुसऱ्या कोणत्याहि सभासदापेक्षां तो या कामांत अधिक वाकबगार समजला जाऊं लागला. येझॉव्हच्या नेतृत्वाखालील हत्याकांड आतां सुरू झालें होतें. स्टॅलिनचा एक मेव्हणा, युरी कॅगानोविच् याला अटक करण्यापर्यंत येझॉव्हच्या हस्तकांची मजल गेल्यामुळें तें प्रकरण अखेरीस येझॉव्हवरच शेकलें; व त्याला व त्याच्या महत्त्वाच्या हस्तकांना फांशी देण्यांत आलें. तथापि युरीऐवजीं निकिताला अटक झाली असती तरीदेखील असाच प्रकार घडला असता इतका स्टालीनचा त्यावेळीं निकितावर विश्वास बसला होता.

## युक्रेनमधील हत्त्याकांड

१९३४ सालीं स्क्रिप्निकनें आत्महत्या केली. तेव्हांपासून युक्रेनमध्यें दोनतीन वेळां लहानसहान प्रमाणांत विरोधकांचा निःपात करण्यांत आला होताच. तथापि १९३७ मध्यें स्टालीननें तेथील विरोधकांचा पूर्णतया बंदोबस्त करण्याचें ठरविलें. पक्षांतील सभासदांचा पाठिंबा कायम राखून हें कार्य साधील असा माणूस त्याला हवा होता. तो कष्टाळु, चलाख व कार्यकुशल असणें जरूर होतें. युक्रेनमध्यें राष्ट्रीयत्वाची भावना अत्यंत तीव्र असल्यामुळें हें काम अत्यंत सावधपणें होणें जरूर होतें. कॅगानोविच्‌ला विचारण्यांत आलें पण तो घोटाळला. यामुळें निकिताची या पदावर नेमणूक झाली. "कामेड क्रुश्चेव्ह हा युक्रेनियन आहे. युक्रेनियनांना रशियन वा ज्यूंनीं आमची कत्तल केली असें म्हणण्यास वाव मिळतां कामा नये. आपल्या शत्रूंच्या हातीं हें प्रचारशस्त्र पडतां उपयोगी नाहीं." हें म्हणणें स्टालिनला पटलें व त्यानें या नेमणुकीस संमति दिली. अशा प्रकारें अवघ्या नऊ वर्षांच्या काळांत पक्षाचा सरचिटणीस बनून निकिता कीव्ह येथें परत आला.

निकितानें येतांच युक्रेनियन कौन्सिलचा अध्यक्ष लुबिशेंको याला अटक करण्याचा डाव रचला; परंतु तो लक्षांत आल्यानें लुबिशेंकोनें त्याचा प्रतिकार करीत अखेरीस आत्महत्या केली. लगेंच सर्व दोषी लोकांना कठोर शासन करण्याचा ठराव मध्यवर्ती समितींत एकमतानें पास होऊन याद्या बरहुकूम गुप्त पोलिसांनीं संशयितांना अटक करावयास सुरुवात केली. हेंच तंत्र पुढें जून १९५३ मध्यें बेरियाला निकालांत काढतांना निकितानें पुनः उपयोगांत आणलें. लुबिशेंकोच्या मृत्यूनंतर एका आठवड्यांतच पक्षाची साधारण सभा होऊन अटक व शिक्षा दोहोंनाहि मान्यता देण्यांत आली. तथापि त्या काळांत युक्रेनचा प्रश्न अत्यंत नाजुक स्वरूपाचा बनला होता. नाझी जर्मनीचें सामर्थ्य वाढत होतें आणि युक्रेनमध्यें असंतोष निर्माण होणें वा राष्ट्रीय भावना उफाळून येणें धोक्याचें होतें. म्हणून एकीकडे विरोधकांचा निःपात करीत असतांना दुसरीकडे त्यानें युक्रेनमधील राष्ट्रीय

भावनेशीं जुळतें घेण्याचेंहि धोरण ठेवलें होतें. युक्रेनियन लेखकांच्या ग्रंथांचें पुनर्मुद्रण सुरू झालें. त्याला युक्रेनी भाषा शुद्ध बोलतां येत नव्हती; म्हणून तिचा वापर करतांना तो प्रत्येकवेळीं क्षमा मागे. युक्रेनियन संगीत व नृत्याचे कार्यक्रम होत व त्यांत तो उत्साहानें भाग घेई.

रूसो-जर्मन कराराला अनुकूल सल्ला त्यानें दिला होता. युक्रेनपासून पहिल्या महायुद्धांत अलग केले गेलेले विभाग जर्मनीच्या साहाय्यानें परत मिळविण्याची ती एक सुवर्णसंधी होती असें त्याचें मत होतें. व स्टालीन आणि मोलोटॉव्ह यांच्या याबाबतच्या आग्रहाला तोच जबाबदार होता.

## दुसरें महायुद्ध

पोलंडकडे गेलेले प्रदेश मिळतांच निकिताचा उत्साह द्विगुणित झाला. तथापि लढाईची शक्यता होतीच. गुप्त पोलिसांच्या रिपोर्टावरून प्रत्यक्ष लढाई झाल्यास युक्रेनियन जनतेच्या निष्ठेविषयीं मुळींच खात्री देतां येणार नाहीं असा अभिप्राय बेरियानें व्यक्त केला होता. व प्रत्यक्ष घडलेंहि तसेंच. हजारों युक्रेनियन युद्धारंभीं नाझींना जाऊन मिळाल्याचें प्रसिद्ध आहे.

युद्धकाळांत कीव्ह विभागाच्या संरक्षण समितीचा निकिता अध्यक्ष नेमला गेला. प्रथम मार्शल बुडेनीला त्यानें साहाय्य करावयाचें होतें. परंतु दोघांचें पटेना. म्हणून १९४१ च्या ऑक्टोबर महिन्यांत बुडेनीला युक्रेनमधून दुसरीकडे पाठविण्यांत आलें. १९४२ ची खार्कोव्हवरील चढाई आखण्यांत टिमोशेंकोला त्यानें साहाय्य केलें. ही चढाई जरी निष्फळ ठरली असली तरी तिच्या योगानें जर्मन सैन्य दोन महिने थोपविलें गेलें. त्याचप्रमाणें रशियन सेनानींना नव्या डावपेचांचा प्रत्यक्ष अनुभव येण्यासहि मदत झाली. येथेंच कोनीव्ह व निकिता यांच्या स्नेहास आरंभ झाला. कोनीव्ह हा हल्लीं सुप्रीम जनरल स्टाफचा प्रमुख आहे.

१९४२ च्या सप्टेंबरमध्यें स्टालिनग्राडचा धोका स्पष्ट दिसूं लागला. आरंभीं तेथें मॅलेंकॉव्हची नेमणूक झाली होती; पण त्याला लगच परत बोलावण्यांत आलें. नंतर मार्शल झुकॉव्ह तेथें आला व तो व निकिता अशा दोघांनीं मिळून लढाईची योजना तयार केली. तथापि डॉन आघाडीवरील प्रमुख सेनानी रॉकॉव्हॉस्की याच्याशीं त्याचा पुढें मतभेद झाल्यानें झुकॉव्हला परत बोलावण्यांत आलें. त्यावेळीं पॉलिटब्यूरोचा सभासद असलेला निकिता जातीनें मॉस्को येथें गेला व त्यानें झुकॉव्हचें समर्थन केलें. झुकॉव्ह व निकिता यांच्या दाट मैत्रीचें हें कारण होय. पॉलिटब्यूरोंत निकिताचा पाठिंबा सातत्यानें झुकॉव्हला मिळत गेला; आणि स्टालीनला झुकॉव्हची अद्यापीहि गरज असल्यानें निकिताची रदबदली उपयुक्त ठरली.

युक्रेनमधून जर्मनसेना पूर्णपणें मागें हटेपर्यंत निकिता सैन्यांत होता. तथापि त्यानंतर मात्र गुप्त-पोलिसद्वारा, नाझींना साहाय्य केल्याबद्दल सुमारें तीस लाख युक्रेनियन लोकांना बेरिया हद्दपार करीपर्यंत तो युक्रेनमध्यें गेला नाहीं. १९४८ सालीं आपणास सरचिटणीस पदावरून दूर करण्यांत यावें व युक्रेनियन सरकारचें प्रमुख पद दिलें जावें अशी त्यानें स्टालीनला विनंती केली. कारण शेतीची समाजवादी पद्धतीनें पुनर्रचना करण्याची एक योजना त्यानें तयार केली होती. व ती त्याला अंमलांत आणावयाची होती. यामळें त्याचाच एक हस्तक मेलनिक हा सरचिटणीस म्हणून नेमला गेला.

## मध्यवर्ती पक्षसमितींतील अधिकारपदावर

१९४९ हें वर्ष स्टालीनच्या गोतावळयांतील कलहांनीं भरलेलें वर्ष आहे. सोव्हिएट सामुदायिक शेतीचें असमाधानकारक स्वरूप आतां उघड होऊं लागलें होतें. आंतरराष्ट्रीय राजकारणांत टीटोमुळें रशियाला धक्का बसला होता. शीतयुद्धाचा प्रश्न होताच.







या सर्व अडचणींचें निराकरण करण्यासाठीं स्टॅलिननें पक्षाची पुनर्घटना करण्याचें ठरविलें. आपल्याकडे सरचिटणीस म्हणून सर्वसाधारण देखरेखीचें काम घेऊन मॅलेंकॉव्हची प्रथम चिटणीस व कुश्चेव्हची द्वितीय चिटणीस म्हणून स्टॅलिननें नेमणूक केली. एकूण सात चिटणीस नेमण्यांत आले होते. निकिताकडे शेती व उद्योगधंद्यांचें क्षेत्र देण्यांत आलें होतें. जुन्या सामुदायिक शेतीऐवजीं शेतकऱ्यांना कामगार बनविण्याची व विद्युत् साहाय्यानें शेतीविषयक बरीच कामें उरकण्याची नवी योजना निकितानें काढली. नवीं "बागेंतलीं शहरें" (Garden Cities) वसवून ही योजना अंमलांत आणावयाची होती. तथापि ती यशस्वी होण्याऐवजीं शेतीचें उत्पादन घटण्यासच जबाबदार ठरली. सोव्हिएट उद्योगधंद्यांच्या पुनर्रचनेचें काम याचवेळीं बुल्गॅनिन पहात असल्यानें हे दोन जुने मित्र एकत्र आले होते. झुकॉव्हला स्वेर्डलॉव्स्कला पाठविण्यांत आलें. ही एक प्रकारें हद्दपारीच होती. त्यालाहि याच सुमारास मुख्यत्वें निकिताच्या प्रयत्नामुळेंच परत बोलावण्यांत आलें. १९ व्या पक्षपरिषदेची तयारी १९५२ मध्यें सुरू झाली. स्टॅलिनला या परिषदेंत पक्षाचें "ऑलरशियन बोल्शेविक कम्युनिस्ट पार्टी" हें नांव बदलून "कम्युनिस्ट पार्टी ऑफ दि सोव्हिएट युनियन" हें नांव देण्याची इच्छा होती. आपल्या कामाचें मूल्यमापन बोल्शेव्हिक कसोटीनें ठरूं नये हाच हेतु त्यांत असावा. निकिता हा बदल स्वीकारण्यास सहज तयार होईल असें वाटल्यामुळें व स्टॅलिनच्या शब्दाबाहेर तो जाणार नाहीं असा विश्वास वाटल्यानें स्टॅलिननें पक्षाची नवी घटना तयार करण्याचें काम त्याच्याकडेच सोपविलें. १९ व्या पक्षपरिषदेंत ही घटना संमतीसाठीं पुढें मांडण्याचें काम निकितानेंच केलें. पक्षाच्या नव्या अधिकाऱ्यांची निवड करण्यासाठीं तयार केलेली यादीहि निकितानेंच पक्षपरिषदेपुढें मांडली. आणि पक्षाच्या घटनेनुसार गुप्त मतदान होण्याऐवजीं ती टाळयांच्या गजरांत एकमतानें पास करून घेण्यांत आली. मॅलेंकॉव्ह प्रथम व निकिता द्वितीय चिटणीस म्हणून निवडले गेले.

### स्टालीनचा मृत्यु

१९ व्या पक्षपरिषदेनंतर नव्या हत्याकांडाचें वातावरण निर्माण करण्याची स्टालीनची मनीषा होती. गुप्त पोलिस संघटनेच्या चौकशी विभागाचा प्रमुख रुमिन यानें त्या दिशेनें पावलें टाकण्यास सुरवात केली. क्रेमलिन कट, डॉक्टरांची अटक, आणि निर्माण करण्यांत आलेलें ज्यूविरोधी वातावरण इत्यादि घटना हेंच सूचित करीत होत्या.

एकाच राष्ट्रांत समाजवादाचा प्रयोग यशस्वी करण्याचें स्टालीनचें धोरण. या धोरणांतून प्रचंड नोकरशाही अस्तित्वांत आली होती. राज्याच्या नोकरांची संख्या सुमारें साडेपांच कोटी. त्यापैकीं सुमारें साडेचार कोटी साधे कामगार. उरलेले अधिकारी. यांची नोकरशाहींत गणना करतां येईल. त्यांच्यांतील सुमारें दहा लाख हे पक्षाचेंच विविध स्वरूपाचें संघटनात्मक कार्य करण्यांत गुंतलेले. या सर्वांना विविध स्वरूपाच्या सवलती उपभोगावयास मिळत. प्रत्यक्ष उत्पादनकार्याच्या दृष्टीनें पक्षांतील विविध अधिकारी हे जरी शुद्ध बांडगुळासारखे असले तरी राजकीय जीवनांत मात्र ती एक मोठी शक्ती होती. आणि ती डोईजड होऊं लागली होती. स्टालीनला आपला नोकरशाहीवरील हल्ला यांच्यापासूनच सुरू करावा असें वाटत असावें.

परंतु लवकरच स्टालीनचा आजार सुरू झाला आणि त्यांतच त्याला मृत्यु आला. मृत्यूची बातमी चार दिवस गुप्त राखण्यांत आली. नोकरशाही व लालसेना यांच्यांत वारशाचा प्रश्न सुटेना. दहा जणांचे प्रेसिडियम निवडले गेले पण स्टालीनचें स्थान कोण घेणार? सहकाराच्या तत्त्वाची घोषणा करण्यांत आली; आणि समझोता होऊन पहिलें








मंत्रिमंडळ नेमलें गेलें. निकिता मध्यवर्ती समितीचा चिटणीस नेमला गेला. रशियन सत्ताधाऱ्यांत त्याचें सातवें वा आठवें स्थान होतें. लवकरच त्यानें याबद्दल सूड उगवला. मॅलेंकॉव्हबरोबर तो दौऱ्यावर गेला आणि स्थानिक अधिकाऱ्यांच्या जुलमाविरुद्ध जनतेच्या गाऱ्हाण्यांची दाद घेणारा व तिचें रक्षण करणारा नेता म्हणून सर्वत्र प्रसिद्ध झाला. मॅलेंकॉव्हच्या भाषणानें श्रोते पेंगावयास लागत. निकिता सगळीकडे भटकून लोकांशीं संभाषण करी व त्यांच्या गाऱ्हाण्यांची दाद घेई.

## बेरियाचा निःपात

दौऱ्यावरून परत येतांच बुल्गॅनिन व बेरिया यांच्यांत कलह सुरू झाल्याचें त्याला दिसून आलें. बेरियानें स्टालीनच्या मृत्यूनंतर 'प्रेसिडियम'च्या संमतीवांचून अनेक खटाटोप सुरू केले होते. आपण आतां विशेष बडे झालों आहोंत या भावनेनें डॉक्टरांची सुटका करणें, अनेक कैद्यांची तुरुंगांतून मुक्तता करणें, मॅगादन आणि वोरकुता येथील कँप बंद करून सुमारें पांच लाख स्थानबद्धांना मुक्त करणें इत्यादि उपायांनीं तो लोकप्रियता संपादन करूं पहात होता. गुप्त पोलीस संघटनेंतील अधिकाऱ्यांच्या नेमणुकाहि तो स्वतंत्रपणें करूं लागला. पाश्चात्य राष्ट्रांच्या धोरणाचा अजमास घेण्याचे प्रयत्न देखील त्यानें स्वतंत्रपणें करावयास सुरुवात केली. तो कट रचीत होता असें जरी नसलें तरी त्याच्या वर्तनाला कटाचा अर्थ मात्र येऊं लागला होता. क्रुश्चेव्ह व बुल्गॅनिन यांची निर्भर्त्सना करावयासहि त्यानें सुरुवात केली. त्याच्या पूर्व-जर्मनीच्या भेटींत त्यानें जनरल ग्रेश्कोला प्रेसिडियमच्या सल्ल्यावांचून आदेश दिले. व अशा प्रकारें हवी असलेली संधी निकिताला मिळाली. २५ जून १९५३ रोजीं आपल्या कचेरींत मध्यवर्ती समितीची सभा बोलावून त्यानें बेरियाच्या अटकेस संमति मिळविली व व्होरोशिलॉव्हच्या सहीचें वॉरंट लगेच तयार ठेवून झुकॉव्ह व कोनीव्ह या दोन सेनानीद्वारां ही अटक घडवून आणली. मॅलेंकॉव्ह व मोलोटॉव्ह हे दोघेहि या सभेस हजर नव्हते हें नमूद करणें जरूर आहे. बेरिया गुप्तपोलीस संघटनेचा प्रमुख होता आणि ही संघटना जनता, नोकरशाही व लष्कर सर्वांनाच अप्रिय होती. म्हणून हें कार्य सुलभ झालें व याच्या मुळाशीं उदार धोरणच असावें असा ग्रहहि निर्माण होण्यास मदत झाली.

याचवेळीं शेतीविषयीच्या मोठमोठया योजना निकिता पुढें मांडीत होता. 'इंफ्रारेड' किरणांच्या द्वारें उष्णता निर्माण करून तुंद्राच्या हिमाच्छादित प्रदेशांतहि मक्याचें पीक काढण्याची कल्पना त्यानें मांडल्याचें प्रसिद्ध आहे. येनकेन प्रकारेण सोव्हिएट रशियांत सर्व कांहीं शक्य आहे असा जनतेचा ग्रह करून देणें आवश्यक आहे. त्यावांचून वैयक्तिक लोकप्रियता व राजवटीचें स्थैर्य कायम राहणार नाहींत असा त्याचा दृष्टिकोण होता.

## सत्ताकलहाची वाढणारी तीव्रता

बेरियाच्या निःपातामुळें बुल्गॅनिन-क्रुश्चेव्ह या दुकलीचें महत्त्व अधिकच वाढलें. परंतु त्या बरोबरच नोकरशाहीस हादरा बसून ती अस्वस्थ झाली. त्यांचा एक प्रतिनिधी मिकोयान याच पक्षाच्या अधिकाऱ्यांत मध्यवर्ती कौन्सिलचा पहिला दुय्यम अध्यक्ष म्हणून स्थान होतें. परंतु नोकरशाहीस सुरक्षितता वाटण्याजोगी परिस्थिती नव्हती. मध्यवर्ती समितीनें क्रुश्चेव्हची पहिला चिटणीस म्हणून निवड केली. आणि नोकरशाहीचा असंतोष कमी व्हावा यासाठीं क्रुश्चेव्हनेंहि साबुरॉव्हप्रणित नव्या अर्थसंकल्पाला मान्यता दिली. रणगाडे, विमानें, यांत्रिक अवजारें इत्यादि वस्तूंच्या उत्पादनाचें प्रमाण कमी करून रेफ्रिजरेटर, लहान मोटारी, रेडियो वगैरेंचें प्रमाण वाढविण्याची कल्पना त्यांत होती. त्याचवेळीं कांहीं खाद्य पदार्थ व कापड यांचें उत्पा-








दन वाढविण्याची सूचना केली व ती संमत झाली. यामुळें खालच्या श्रेणींतील लोकांचा खरा कनवाळु मॅलेंकॉव्ह हाच होय असा गवगवा झाला. आणि तो व मिकोयान हे एकत्र येऊन क्रुश्चेव्हला निकालांत काढण्याची शक्यता वाटूं लागली. क्रुश्चेव्ह ऐवजीं मॅलेंकॉव्हलाच पक्षाचा पहिला चिटणीस म्हणून निवडलें पाहिजे असें उघडपणें बोलण्यांत येऊं लागलें. पक्षाच्या मध्यवर्ती समितीच्या सभेंत त्याच्या शेतीविषयक योजनांची टरहि उडविण्यांत आली.

निकितानेंहि आगामी संकटाला तोंड देण्याची तयारी चालवली. बुल्गॅनिनशीं स्नेहसंबंध वाढवून यांत्रिक व लष्करी मालाच्या उत्पादनांत कपात झाल्यामुळें अस्वस्थ झालेल्या लष्करी वर्तुळांशीं तो संबंध जोडूं लागला. त्याचप्रमाणें भांडवली उत्पादनास विरोध करणारांत बुखारिन, टॉम्स्की, रायकॉव्ह सारखे विद्रोही होते याची आठवण देऊन आपल्या धोरणास पाठिंबा मिळविण्यासाठीं त्यानें वृत्तपत्रांतूनहि प्रचार आरंभिला. मॅलेंकॉव्ह उघड रीतीनें झगडा सुरू करणार नाहीं. अशी त्याची खात्री होती. " उपभोग्य वस्तूंच्या उत्पादनावर भर देण्यांतील मार्क्सवादविरोधी प्रमाद " स्पष्ट करण्याचा आदेश पक्षाच्या स्थानिक शाखांच्या अधिकाऱ्यांना देण्यांत आला. १९५४ च्या ऑक्टोबर महिन्यांत क्रुश्चेव्ह, बुल्गॅनिन, मिकोयान व सुस्लॉव यांचें एक शिष्टमंडळ चीनला गेलें व तेथील काम आटोपून परत येतांना सोव्हिएटच्या आशियाई प्रदेशांतून सुमारें दोन महिने दौरा काढला.

कझगस्तानमधील जमिनीच्या प्रश्नाबाबत निकितावर टीका झाली होती. मध्यवर्ती समितीचा एक चिटणीस पोनोमॉरेंको यानें समितींतील निकिताच्या विरुद्ध कटाची आखणी केली होती. म्हणून मॉस्कोस परत येतांच त्यानें पोनोमॉरेंकोची तोंडभर स्तुति करून कझगस्तान पक्षाचा पहिला चिटणीस म्हणून त्याची तिकडे रवानगी केली. व तेथील जमिनीचा प्रश्न सोडवितां आला नाहीं म्हणून त्यास बडतर्फ केलें. जुनें स्टालिनचेंच तंत्र होतें हें ! दुसऱ्या एका चिटणीसाचाहि अशाच प्रकारें निकाल लावला; व त्यामुळें उरलेले चिटणीस मुळीं ठावठिकाणा न सांगतां नाहींसेच झाले. त्यांच्या जागीं आपल्या विश्वासांतील माणसांच्या नेमणुका केल्यानंतर शुद्ध वैयक्तिक कारणासाठीं त्यानें मॅलेंकॉव्हवर हल्ला सुरू केला. तथापि मॅलेंकॉव्ह हा सोव्हिएट युनियनमध्यें अत्यंत लोकप्रिय असल्यानें त्याला पदच्युत करणें सोपें नव्हतें. म्हणून निकितानें अत्यंत जपून पावलें टाकावयास हवीं होतीं; व तसें त्यानें केलेंहि. प्रथम पगारवाढ जाहीर करण्यांत आली; अर्थात् अमलांत मात्र ती मर्यादित प्रमाणांतच आली हें निराळें ! दुसरें म्हणजे क्रेमलिनमध्यें रहाणारे सर्व बडे नेते दुसरीकडे रहावयास गेले व तेथें पहाण्यासाठीं जाण्याची लोकांना परवानगी मिळाली. याबरोबरच क्रुश्चेव्हनें परदेशीय वृत्तपत्रांच्या बातमीदारांस मुलाखती देण्यास सुरवात केली; आणि त्यामुळें सर्वत्र तो एक " बडबड्या " आहे असा गैरसमज निर्माण होऊं लागला. पण त्यावेळींच तो मॅलेंकॉव्हची हकालपट्टी करण्याची अत्यंत कौशल्यपूर्ण योजना आखीत होता; इतकी कीं, अनेकांनीं त्यापासून एकाद दुसरी युक्ति शिकावी ! पक्षांतील मतदान निश्चितपणें आपल्या बाजूनें जाईल याची त्यानें पूर्णपणें काळजी घेतली. त्याबरोबरच परदेशी वार्ताहरांजवळ आपला स्नेही बुल्गॅनिनबद्दल सर्वत्र अनुकूल अभिप्राय होऊं लागला. अखेरीस १९५५ च्या जानेवारींतील मध्यवर्ती समितीच्या सभेंत भांडवली व उपभोग्य वस्तूंच्या उत्पादनाचें पूर्वीचेंच प्रमाण कायम ठेवावें असें मॅलेंकॉव्हनें सुचवितांच निकितानें त्याच्यावर हल्ला चढविला. मिकोयाननें एव्हांना आपली बाजू बदलली असल्यानें तोहि त्यांत सामील झाला व ही सूचना मान्य केल्यास

चीनशीं झालेले आमचे करार आम्ही पुरे करूं शकणार नाहीं असें तो म्हणाला. तथापि उघडपणें मॅलेंकॉव्हनें राजिनामा द्यावा असा ठराव मांडणें धोक्याचें आहे हें ओळखण्याइतका निकिता धूर्त होता. यामुळें बुल्गॅनिनच्या पत्नीकरवीं राजीनाम्याची ही सूचना मॅलेंकॉव्हच्या पत्नीस करण्यांत आली; व तिनें मॅलेंकॉव्हला राजीनामा देण्यास उद्युक्त केलें. त्यानें आपण होऊन आत्मटीका करून पंतप्रधानपद सोडायचें; व त्याबद्दल त्याला प्रेसिडियममध्यें कायम ठेवायचें असा हा 'करार' होता. मॅलेंकॉव्ह आपल्याच मुखानें आपल्या वर्तनांतील चुकांची देत असलेली कबुली त्याच्याविरुद्ध केव्हांहि उपयोगांत आणणें शक्य असल्यानें निकिता आतां निश्चित झाला होता.

## क्रुश्चेव्ह-बुल्गॅनिन दुक्कल

मॅलेंकॉव्हच्या जागीं बुल्गॅनिनची निवड करण्यांत आली. आणि अशा प्रकारें क्रुश्चेव्ह-बुल्गॅनिन दुक्कल प्रामुख्यानें पुढें आली. तथापि या विजयामागें अनेक गोष्टी दडलेल्या होत्या. विजयाची किंमत म्हणून लष्कर, हवाई दल व आरमारांतील अनेकांना बढत्या मिळाल्या. कोणत्याहि पक्षसभासदास त्याच्या पक्षीय समितीच्या अनुज्ञेवांचून पकडतां येणार नाहीं असें आश्वासन पक्षाला मिळालें. जनतेसाठीं न्यायनिवाड्याचें प्रोसीजर नवें कोड निश्चित करण्याचें अभिवचन देण्यांत आलें. ग्रंथ व नियतकालिकें यांतील लेखनाचा रोख बदलूं लागला. निकिताच्या जीवनाची सामाजिक पार्श्वभूमी, त्याचें जीवन, पक्ष व जनता यांच्यांतील त्याचें स्थान इत्यादींचा विचार करतां वैयक्तिक हुकूमशाही प्रस्थापित करण्याची धडपड करण्याऐवजीं ती प्रस्थापित होऊं शकणार नाहीं असें वातावरण निर्माण करणेंच त्याला अधिक सुरक्षित वाटलें. व यांतूनच विसाव्या पक्षपरिषदेपुढील त्याचें स्टालीनवर हल्ला चढविणारें भाषण झालें. याचीच दुसरी बाजू म्हणजे आंतरराष्ट्रीय राजकारणांत त्यानें स्वीकारलेलें समझोत्याचें धोरण ही होय. १९५५ च्या जूनमध्यें परराष्ट्रमंत्रीपदाचा मोलोटॉव्हनें राजीनामा दिल्यानंतर शेपिलॉव्हची त्याच्या जागीं नेमणूक झाली; आणि परराष्ट्रीय धोरण निकिताच्या कलानेंच पूर्णपणें चालूं लागलें. या समझोत्याच्या धोरणाचा प्रचार करण्याच्या हेतूनेंच युगोस्लाव्हिया, आशियांतील अनेक राष्ट्रें, इंग्लंड इत्यादींचा बुल्गॅनिन–क्रुश्चेव्ह या दुक्कलीनें प्रवास केला. टिटोकडे जाण्यांत विविध मार्गांनीं समाजवादाकडे जातां येईल अशी कबुली होतीच. मात्र टिटोशीं संबंध बिघडले याबद्दलची जबाबदारी बेरियावर टाकण्याचा त्याचा प्रयत्न अगदींच हास्यास्पद होता.

## विसावी पक्षपरिषद

राजकीय पकड थोडीशीं ढिली करावयास एकदां आरंभ केला म्हणजे परिस्थिती हळूहळू आवाक्याबाहेर जाण्याचाहि संभव आहे अशी निकिताला भीति वाटे. पण नोकरशाहीला मात्र तसें वाटत नव्हतें. यामुळें स्टालीन व स्टालीनवाद पूर्णपणें झुगारून देण्याची मिकोयानची मागणी होती. तसें केल्यावांचून नोकरशाहीचें आसन स्थिर होणें कठीण होतें. निकिताची ह्या दिशेनें अर्धें अधिक जाण्याची तयारी होती. प्रथम प्रथम या दोन गटांत कलह होण्याचा फारसा संभव दिसत नव्हता. आणि अखेरीस दुफळीचें दृश्य बाह्य जगाला दिसूं नये म्हणून स्टालीनवादाला कायमची मूठमाती देण्यालाहि निकितानें मान्यता दिली. कारण मिकोयानला बुल्गॅनिनचीहि सहानुभूति अंशत: मिळाली होती. त्याचें राजकीय जीवन पक्षयंत्रणेचें काम पहाणारा कार्यकर्ता म्हणून सुरूं झालें होतें व त्या गटाचा त्याला पाठिंबा मिळण्याचा संभव होता. राज्यांतील नोकरशाहीचा तर तो प्रतिनिधीच होता. पक्षाचा पहिला चिटणीस म्हणून त्याचें नांव सुच-








विलें जाण्याचा संभव होता हें क्रुश्चेव्ह जाणून होता. मिकोयानच्या भाषणाचें परिषदेंत अत्यंत उत्साहानें स्वागत झाल्याचें पहातांच परिस्थिति ओळखून निकितानें स्टालिनवर हल्ला चढविला. पण त्याबरोबरच त्यानें आपला स्नेही झुकॉव्ह याला प्रेसिडियमचा दुय्यम सभासद म्हणून निवडून नोकरशाहीला शह देण्याचा प्रयत्नहि सुरूं केला.

एकोणिसाव्या पक्षपरिषदेनें निवडलेल्या मध्यवर्ती समितींतील प्रतिनिधित्व पक्षसंघटना चालविणारे ५५ टक्के, नोकरशाही २० टक्के, लष्करांतील माणसें १५ टक्के व किसान-कामगार १० टक्के असें होतें. २० व्या परिषदेंतील निवडणुकींत पहिल्या गटाचें प्रतिनिधित्व १० टक्के कमी झालें व दुसऱ्या व तिसऱ्या गटांचें पांच पांच टक्के वाढलें. पहिला गट हाच बव्हंशीं निकिताचा. तथापि त्याचें बहुमत नष्ट झाल्यानें, किसान-कामगारांच्या १० टक्के मतांचा पाठिंबा मिळविण्याची त्याची धडपड सुरूं आहे. व त्यासाठीं रशिया हें नोकरशाहीवर आधारलेलें राज्य नसून सामाजिक न्याय हाच त्याचा पाया आहे असें भासविण्याचें त्याचें धोरण आहे. लष्करांतील अनेकांचीहि त्याला सहानुभूति आहे.

किसान-कामगारांतून स्वतःच्या कर्तृत्वानें निकिता वर आलेला आहे. आणि यामुळें सामाजिक न्यायाविषयीं त्याला आकर्षण आहे. रशियन नोकरशाही यंत्रणेचाहि त्याला भरपूर अनुभव आहे. तो त्या यंत्रणेंतील दोष जाणतो व मोठ्या कौशल्यानें तिचा उपयोग करूं शकतो. रशियाजवळ सर्व जगाला तारणारा संदेश आहे अशा समजुतीनें भारावलेल्या वातावरणांतच त्याचें राजकीय जीवन सुरूं झालें; आणि अजूनहि त्याची तीच समजूत आहे. सत्य काय तें आपणाजवळच आहे अशी त्याची निष्ठा आहे. विरोधकांचा निःपात उडविण्याच्या कार्यांत त्यानें भरपूर भाग घेतला असून तें तंत्र त्याला चांगलेंच अवगत आहे. व पूर्णतया वैयक्तिक स्वरूपाच्या सत्ताकलहांतहि तो हिरिरीनें पडलेला आहे. यामुळें त्याचें नेतृत्व म्हणजे एका नव्या झोटिंगशाहीचा उदयच मानावयाचा कीं त्यामुळें रशियन जनतेच्या दीर्घकालीन हौतात्म्याला यापुढें आळा बसेल अशी आशा बाळगायची हें एक अजून तरी न सुटलेलें कोडेंच आहे.[१].

---

१ व्हिक्टर अलेक्झांड्रॉव्ह यांच्या " क्रुश्चेव्ह ऑफ दि युक्रेन—अ बायोग्रफी " या ग्रंथाच्या आधारानें.

---



अनुक्रमणिका







प्रा. विनायक वा. कोगेकर

# मनुष्यनिर्मित उपग्रह

मनुष्याला अनादि कालापासून आकाशस्थ ग्रह व तारे या चमकदार वस्तूंबद्दल कुतूहल वाटत आहे. म्हणूनच खगोलशास्त्र हें एक खूपसें पुरातन-शास्त्र आहे. या ग्रहांचे व ताऱ्यांचे वेध घ्यावे, त्यांच्या भ्रमणाची गति मापावी व त्यांच्या कक्षांचें अचूक निदान करावें यासाठीं अनेक खगोल शास्त्रज्ञ व ज्योतिर्विद यांनीं कित्येक शतकें संशोधन केलेलें आहे. पण हें सारे संशोधन दुरून केलेलें, कित्येक लक्ष मैलांवरून केलेलें आहे. त्यामुळें दुरून चमकदार भासणाऱ्या, ठराविक वेळीं ठराविक ठिकाणीं उगवणाऱ्या व मावळणाऱ्या या आकाशस्थ पदार्थांबद्दलची मनुष्यांची जिज्ञासा केवळ अंशतःच तृप्त झाली.

## विश्वविषयक कुतूहल

गेल्या सुमारें कांहीं शतकांत भौतिक शास्त्रांत, प्रायोगिक क्षेत्रांत खूपच मोठें संशोधन झालें आहे. परमाणु-शक्तीच्या संशोधनांत व तिच्या प्रत्यक्ष व्यावहारिक उपयोगांत त्याचा परमोत्कर्ष झाला. त्यामुळें प्रत्यक्ष प्रयोगानें पृथ्वीवरील पदार्थांचें व क्रियांचें निरीक्षण चांगल्या प्रकारें साध्य होऊं लागलें. त्यासाठीं उपयोगांत आणलेल्या यंत्रांचें व तंत्रांचें साहाय्य घेऊन पृथ्वीच्या पलीकडे लक्षावधि मैलांवर असणाऱ्या ग्रहांचा व ताऱ्यांचा आणि अखेरीस अनंत अवकाशाचा मागोवा घेण्याची महत्त्वाकांक्षा शास्त्रज्ञांच्या मनांत ठाण देऊन बसली. शास्त्रज्ञांना आपल्या पृथ्वीवरील संशोधनाच्या मर्यादांची तीव्र जाणीव झाली. विश्वाच्या नियमनाचें व वैश्विक क्रिया-प्रक्रियांचें नियमन अत्रस्थ परिणामांनीं व परिमाणांनीं जाणतां येणार नाहीं याची जाणीव झाली. पृथ्वीकडे तिच्यापासून सुदूर अंतरावरून पाहून तिचा अभ्यास करण्याची इच्छा त्यांच्या मनांत अंकुरली आणि एका तात्त्विक समस्येचा उलगडा करण्याची तीव्र कांक्षा त्यांच्यांतील तत्त्वचिंतकांच्या मनांत उद्भवली. ती समस्या म्हणजे "या विश्वांत पृथ्वीवरील मनुष्यजात एकटीच आहे कां ? कां दुसऱ्या एखाद्या वैश्विक वास्तूवर आपल्या चिंतनशीलतेबद्दल, बुद्धीबद्दल व कर्तृत्वशक्तीबद्दल गर्व बाळगणाऱ्या येथील मनुष्यजाती-पेक्षां सर्व क्षेत्रांत श्रेष्ठ असा कोणी बुद्धिशाली, जिवंत प्राणी वस्ती करून राहिलेला आहे ?"

## प्रत्यक्ष "मुलुखगिरी"चा आरंभ

या समस्यांचा उलगडा केवळ अंदाजानें करून समाधान होण्याचा काळ कित्येक शतकें मागें पडला असल्यामुळें प्रत्यक्ष मुलुखगिरी करूनच माहिती प्राप्त करून घेण्याची योजना करणें जरूरीचें ठरलें. यांतूनच चंद्र, मंगळ इत्यादि ग्रहांवर "स्वारी" करण्याची योजना, केवळ कल्पनेंत कां होईना, तयार होऊं लागली. कित्येक देशांत या स्वारीसाठीं सैन्यांची व साधनांची जमवाजमव करण्यापर्यंत मजल मारण्यांत आली.; युयुत्सु वृत्तीच्या, साहसी व जिज्ञासू मंडळींच्या याद्या तयार करण्यांत आल्या. कित्येक देशांतल्या "विश्वसंचार संस्थांनीं" या ग्रहांवरील जमिनींची विक्री करायला, त्याबाबतचे शेअर्स विकायला सुरुवात केली !! ललित लेखकांनीं उपलब्ध माहितीच्या मर्यादित पायावर कल्पनेचे इमल्यावर इमले उठवून अद्भुत कथांची एक अनोळखी सृष्टि निर्माण केली. अशा रीतीनें मोठ्या खगोलशास्त्रज्ञांपासून अद्भुतरम्य वाङ्मयांत रमणाऱ्या एखाद्या सामान्य पृथ्वीजनांपर्यंत साऱ्यांच्या अंतःकरणाचा ठाव या विश्वसंचाराच्या अद्भुतरम्य योजनेनें घेतला.








१९५५ सालीं अमेरिकेच्या अध्यक्षांनीं विश्वसंचाराची मुहूर्तमेढ रोंवणाऱ्या आपल्या देशांतील योजनांची सुरुवात १९५८ च्या मार्चमध्यें होईल असें जाहीर केल्यापासून तर या विषयाबद्दलचें कुतूहल मोठ्या प्रमाणावर जागृत झालें. पण तरीसुद्धां सामान्य मनुष्याच्या दृष्टीनें हें सारें केवळ स्वप्नरंजनच होतें.

" पृथ्वीभोंवती भ्रमण करण्यासाठीं रशियानें एक कृत्रिम उपग्रह अवकाशांत भिरकावून दिला आहे. तो पृथ्वीपासून ५६० मैल अंतरावर ताशीं १६००० मैलांच्या गतीनें ९६ मिनिटांत पृथ्वी-प्रदक्षिणा करूं लागला आहे, व त्याच्याकडून येणारे बिनतारी संदेश पृथ्वीवरच्या विविध प्रदेशांत नोंदले जात आहेत. "

अशी बातमी ता. ५ ऑक्टोबर १९५७ रोजीं प्रसिद्ध झाली आणि एकाएकीं अद्भुतरम्यतेला, स्वप्नसृष्टीला वास्तविकतेच्या पायावर स्थानापन्न करण्याचें मोठें, संस्मरणीय कार्य रशियानें केल्याची जाणीव सर्वांना झाली.

गेल्या कांहीं दिवसांत तो ग्रह पाहण्यासाठीं साऱ्या मानवजातीचे डोळे आकाशाकडे लागलेले आहेत. त्या ग्रहाकडून (रशियाचा " बालचंद्र " स्पूटनीक) अनंत अवकाशांतून येणारी पीप् पीप् पीप्‌ची संदेशवाणी ऐकण्याची सर्वांना अतीव उत्सुकता लागलेली आहे. जणुं स्वर्गांतून येणारी देववाणी आकाशवाणींतून आपल्या कर्णपथावर पडावी म्हणून सारे अधीर झाले आहेत ! हळुंहळूं आश्चर्याचा भर ओसरेल, अद्भुततेचें वलय विरेल व उपग्रह-जिज्ञासा व विश्वसंचार-जिज्ञासा सर्वांच्याच मनांत संचार करूं लागेल. त्या जिज्ञासेची स्वल्प प्रमाणांत तृप्ति करण्यासाठीं या बालचंद्र प्रकरणाची सामान्य माहिती देण्याचा येथें प्रयत्न केला आहे.

**वैज्ञानिक आधार**

न्यूटनच्या गुरुत्वाकर्षणाच्या सिद्धान्ताप्रमाणें विश्वांतील प्रत्येक वस्तु दुसऱ्या वस्तूला आकर्षित करीत असते. हें आकर्षण त्या वस्तूंच्या पुंजभारांबरोबर वाढत जातें व त्यांच्यांतील अंतर वाढतांच कमी कमी होत जातें. या गुरुत्वाकर्षणामुळेंच पृथ्वीवरील कोणताहि पदार्थ पृथ्वीपासून फार अंतरावर स्थिर राहणें शक्य नाहीं. कारण पृथ्वीचा पुंजभार इतका प्रचंड आहे कीं, दुसऱ्या पदार्थाच्या छोट्या पुंजभारावर तो सहज मात करतो, अंतर खूप वाढविलें तरीहि हें आकर्षण कायमच राखतो. त्यामुळें विश्वसंचार करायला निघणाऱ्या प्रत्येक पदार्थाला प्रथम या गुरुत्वाकर्षणावर मात करणें जरूर असतें. दुसरें असें कीं, पृथ्वीभोंवतीं असणारें वातावरण अनेकविध वायुरुप पदार्थांचें बनलेलें आहे तरीहि पृथ्वीपासून दूर जाणाऱ्या पदार्थाला तें शक्य तितका विरोध करतें. अर्थात् हा विरोध पहिल्या ७–८ मैलांपर्यंत कमाल असतो पण पुढें पुढें तो कमी होत जातो व सुमारें २०० मैलानंतर तर तो जवळ जवळ नष्टच होतो. या व इतर अडचणींचा विचार करणें ही " उपग्रह " प्रकरणाची नांदी समजायला हरकत नाहीं.

पृथ्वीपासून दूर जाणाऱ्या पदार्थाचा बाहेर जाण्याचा वेग व पृथ्वीचें आकर्षण यांत सारखी रस्सीखेंच चालूं असते. यांत बहुधा आकर्षणाची सरशी होऊन बाहेर जाणारा पदार्थ परत पृथ्वीवर येऊन पडतो. पण जर बाहेर जाणाऱ्या पदार्थाचा वेग महान् असला व तो सारखा वाढतच राहिला तर तो पदार्थ पृथ्वीच्या आकर्षणाच्या कक्षेच्या बाहेर नेतां येणें शक्य होतें. यासाठीं एखाद्या महावेगी आकाशमार्गी वाहनाची त्या पदार्थाला मदत देणें जरूरीचें ठरतें. आणि अशा वाहनाची सिद्धता करणें ही प्राथमिक गोष्टच कित्येक वर्षें संशोधकांना हुलकावण्या देत होती. गेल्या महायुद्धाच्या काळांत जर्मनीनें तयार केलेल्या " व्ही-२ " या अग्निबाणानें संशोधकांना याबाबत आशेचा किरण दाखविला. 'व्ही-२ अग्निबाण' म्हणजे एक प्रचंड अस्त्रच

होतें. त्याचें वजन सुमारें १४ टन होतें. ताशीं ३५०० मैल इतक्या वेगानें त्यानें २२० मैल अंतर काटलें. यासाठीं ६५ सेकंदांत सुमारें ९ टन इतक्या इंधन-द्रव्याचा त्यानें स्वाहाकार केला आणि ६ लक्ष अश्वशक्ति इतकी शक्ति त्याच्या इंजिनांत निर्माण झाली.

**अग्निबाण व विमानें**

विमानें, आगगाड्या, मोटारी इत्यादि वाहनांत व या अग्निबाणांत कार्यपद्धतीच्या दृष्टीनें खूपच फरक आहे. कित्येकदां या अग्निबाणाची तुलना बंदूकीशीं केली जाते. बंदूकींतून गोळी वेगानें बाहेर पडली कीं, तिच्या प्रतिक्रियेनें बंदूकहि कांहीं प्रमाणांत मागें ढकलली जाते. नवख्या बंदूक चालकांच्या खांद्याला तिच्या दस्त्याचा धक्काहि बसतो. त्याचप्रमाणें या अग्निबाणाच्या शेपटांतून ज्वलन्त ज्योतीचा झोत बाहेर पडतो व त्याच्या प्रतिक्रियेनें अग्निबाण त्याच्या नाकाच्या बाजूनें दूर फेंकला जातो. यापेक्षां अग्निबाणांतल्या क्रियेचें चांगलें स्पष्टीकरण खेळांतल्या फुग्याच्या उदाहरणानें देतां येतें. फुगा फुगविला व त्याचें तोंड आंवळून धरलें तर फुग्यांत हवा कोंडलेली रहाते, दाबाखालीहि रहाते. पण फुग्याचें स्थान स्थिरच रहातें. कारण सर्व बाजूंनीं बाहेरील हवेचा दाब सारखाच असतो. पण जरा हा फुगा सोडून दिला तर आंतील हवा फुग्याच्या तोंडाकडून वेगानें बाहेर पडते व फुगा विरुद्ध दिशेला फेंकला जातो. अग्निबाणांची संचलन शक्ति ही अशीच मिळविलेली असते. अग्निबाणांला एक निमुळत्या तोंडाची तोटी शेंपटांच्या बाजूला बसविली तर तिच्यांतून बाहेर पडणारा वायुरुप इंधनद्रव्याचा झोत एकदम प्रसरण पावेल. म्हणजेच त्या वायुरुप पदार्थाचे अणु वेगानें धावूं लागतील व मागच्या बाजूच्या अग्निबाणाला आणखी जोराचा धक्का व जोराची गति प्राप्त होईल. क्रिया जितकी जोराची व वेगाची तितकीच प्रतिक्रिया जोराची व वेगाची हा सर्वविख्यात सिद्धान्त याच्या बुडाशीं आहे. अग्निबाणाच्या पोटांत ज्वलनाची क्रिया सतत चालूं ठेवली तर वर वर्णिलेली प्रतिक्रिया सतत चालूं राहून त्याचा वेग वाढवितां येईल. सामान्य वाहनांतील इंजिनें आपली संचलनशक्ति इंधनांच्या ज्वलनापासून मिळवितात, त्यासाठीं लागणारा ऑक्सिजन-वायु तीं इंजिनें हवेंतून मिळवितात. त्यामुळें त्यांच्या संचलनासाठीं ऑक्सिजनयुक्त हवेची नितान्त आवश्यकता असते. याहि बाबतींत अग्निबाणाचा खाक्या वेगळाच आहे. त्याच्या अंतर्गत ज्वलनासाठीं लागणारें इंधन तर त्याच्या पोटांत सांठविलेलें असतेंच, शिवाय जरूर तितका ऑक्सिजनचा सांठाहि ठेवलेला असतो. त्यामुळें निर्वात प्रदेशांतहि अग्निबाणाचें संचलन सुखेनैव होत रहातें.

अग्निबाणांत घन व द्रवरूप अशीं दोन्हीं प्रकारचीं रासायनिक इंधनें व ऑक्सिजन देणारा पदार्थ (बहुधा द्रवरुप ऑक्सिजनच) अशा दोन पदार्थांचा सांठा करावा लागतो. सामान्यतः घनरूपाऐवजीं द्रवरूप इंधनें वापरणारे अग्निबाण जास्त वेगवान् व कार्यक्षम असतात. या दुसऱ्या प्रकारच्या अग्निबाणांच्या इंजिनांची रचना खूपच गुंतागुंतीची असते. त्यांत दाब, तपमान व ज्वलनोत्तर निर्माण होणाऱ्या वायुरुप पदार्थांचा वेग या तीन्ही गोष्टींचें प्रमाण प्रचंड मोठें असल्यामुळें इंजिनांच्या सुरक्षिततेसाठीं मुद्दाम विचारपूर्वक योजना करावी लागते. इंधनद्रव्यांच्या ज्वलनानंतर निर्माण होणाऱ्या वायूंचा दाब प्रत्येक इंच क्षेत्रावर ४०० पौंड इतका निर्माण होण्यासाठीं अग्निबाणाचें इंजिन प्रत्येक सेकंदाला १५२.५ पौंड द्रव ऑक्सिजन व १२३.५ पौंड अल्कोहोल यांचा फडशा पाडतें. अशा अग्निबाणाचा वेग ताशीं सुमारें ५००० मैल असतो. म्हणजे मुंबई—लंडन अंतर सुमारें एका तासांतच त्याला काटतां येईल (वेग कायम राहिला तरच !). त्याच्या इंजिनांत सुमारें ४००० अंश फॅरेनहाइट इतकें उष्णतामान निर्माण होईल. त्या उष्णतामानाला सर्वसामान्य



अनुक्रमणिका








धातुरूप पदार्थ सहज वितळून जातील. अर्थात् इंजिनची धातूंची भिंत वितळूं नये म्हणून मुद्दाम काळजीपूर्वक योजना करावी लागतेच.

हवेंत भ्रमणाऱ्या विमानांच्या इंजिनांत व अग्नि-बाणांच्या इंजिनांतहि खूपच फरक असतो. हवा जसजशी विरळ होत जाते तशी विमानांच्या इंजिनांची अवकाशांत झेंपावण्याची ( थ्रस्ट ) ताकद क्षीण होत जाते; उलट अग्निबाणांच्या इंजिनांची झेंपावण्याची शक्ति वाढत जाते व हवेचा दाब शून्यावर आला कीं, ही शक्ति कमाल मर्यादा गांठते. अग्निबाणांत इंधनांचें ज्वलन फारच झपाट्यानें होतें. त्यामुळें त्यांचें वजन झपाट्यानें कमी होतें. कमी होत जाणारें वजन व जोरदार होत जाणारी झेंप यामुळें अग्निबाणांचा वेग झपाट्यानें वाढत जातो, आणि वातावरणाच्या बाहेर निर्वात थरांत तर वेगाची कमाल मर्यादा गांठली जाते. अवकाशांत घुसणाऱ्या अग्निबाणाच्या उड्डाणाची दिशा कायम राखणें जरूर असतें. नाहीं तर वातावरणाच्या बाहेर जाण्यासाठीं सोडलेला अग्निबाण वाटेंत त्याच वातावरणांत पृथ्वीशीं समांतर होऊन अखेर जमिनीवरच आदळायचा ! हें टाळण्यासाठीं ज्याप्रमाणें विमानांत वैमानिक असतो त्याप्रमाणें या अग्निबाणांत एकादा जिवंत संचालक ठेवणें कठीणच. म्हणून एका यांत्रिक संचालकाची योजना करावी लागते. हा यांत्रिक संचालक दोन वस्तूंचा बनलेला असतो. एक " जायरोस्कोप " व दुसरी वस्तू म्हणजे एक " मोठा लंबक ". पैकीं जायरोस्कोप म्हणजे भोंवऱ्याप्रमाणें गरगरणारी वस्तु. अग्नि-बाणाच्या दिशेंत फरक पडूं लागतांच हा जायरोस्कोप अग्निबाणाची इष्ट दिशा कायम राखण्याची सर्व तरतूद तत्काळ करतो. मानवी शरीरांतल्या मेंदूप्रमाणें हा अग्निबाणांतला मेंदूच.

१९३७ सालचे सुरुवातीचे अग्निबाण शिकस्त म्हणजे दीड दोन मैलांची उंची गांठत तर १९४७ मध्यें त्यांनीं १२८ मैलांपर्यंत मजल मारली. दोन टप्प्यांनीं वेग घेणाऱ्या अग्निबाणांनीं अलिकडेच २५०. मैलांची उंची गांठलेली आहे.

अशा रीतीनें पृथ्वीच्या वातावरणाबाहेर विश्वसंचाराला जाण्यासाठीं जरूर लागणाऱ्या वाहनाची प्राथमिक सिद्धता तर झाली.

## विश्वसंचाराचें वाहन

त्यानंतर या वाहनांत बसवून एखादी वस्तु प्रयोग म्हणून विश्वसंचारासाठीं सोडण्याची तयारी सुरू झाली. ही वस्तु पृथ्वीच्या वातावरणाबाहेर टिकून रहाण्यासाठीं गुरुत्वाकर्षणाच्या शक्तीशीं समतोल राखूं शकेल इतक्या वेगानें तिला पृथ्वीभोंवती एखाद्या कक्षेंतून सतत भ्रमण करावें लागेल. लहान मुलें एखाद्या दोरीच्या टोकाला चेंडू वा दगड बांधतात व दोरीचें दुसरें टोंक धरून तों चेंडू डोक्याभोंवतीं फिरवतात. या खेळांत दोरी चेंडूला मुलाच्या हाताकडे खेंचत असते तर चेंडूला मिळालेली गति त्याला हातापासून दूर खेंचत रहाते. या दोन्हींमध्यें जोपर्यंत समतोल रहातो तोंपर्यंत चेंडू वर्तुळाकार कक्षेंत भ्रमण करीत रहातो. गति कमी झाली कीं, तत्काळ चेंडू हातावर आदळतो. दोरी जर नाजूक असेल तर गति वाढतांच दोरी तुटेल व चेंडू दूर भिरकावला जाईल. अगदीं अशाच प्रकार पृथ्वी व बाहेर भिरकावलेली वस्तु यांच्या बाबतीत होणार. वरील उदाहरणांतील हाताच्या जागीं पृथ्वी, दोरीच्या जागीं गुरुत्वाकर्षण, चेंडूच्या जागीं पृथ्वीबाहेरील वस्तु अशी कल्पना केली म्हणजे या क्रियेचें स्वरूप स्पष्ट होतें. म्हणजे या वस्तूला अवकाशांत घेऊन जाणाऱ्या अग्निबाण-वाहनाला त्या वस्तूला इष्ट इतका वेग देण्याची कामगिरी करावी लागणार. दुसरेंहि एक काम या वाहनाला करावें लागेल. वस्तू सरळ अवकाशांत नेऊनच केवळ भागणार नाहीं, तर वर गेल्यानंतर एका विशिष्ट कोनांत कलतें होऊन ती वस्तू तिच्या इष्ट कक्षेंत ठेवावी लागेल. अशा रीतीनें पृथ्वीबाहेर








भ्रमत राहणाऱ्या वस्तूला " उपग्रह " असें म्हणतां येईल.

समजा, ३०० मैल उंचीवर एक उपग्रह सोडावयाचा आहे. त्यासाठीं तीन टप्प्यांनीं उडणारा त्रिदल अग्निबाण वापरावा लागेल. त्याची उंची सामान्यतः ७५ फूट इतकी असावी लागेल. पहिल्या टप्प्यांत हा अग्निबाण साऱ्या संभारानिशीं (इंधनें, उपग्रह इत्यादि ) २ मिनिटांतच ४० मैलांची उंची गांठेल. या ठिकाणीं अग्निबाणाचें पहिलें 'दल' अलग होईल. दुसऱ्या टप्प्यांत ताशीं सुमारें ११००० मैलांच्या वेगानें हा अग्निबाण १३० मैलांची मजल गांठेल आणि हवेच्या विरलतेमुळें ३०० मैल उंचीपर्यन्त सहजतेनें चढेल. या ठिकाणीं दुसरें 'दल' अलग होईल, आणि अखेरच्या टप्प्याची क्रिया सुरू होईल. याच ठिकाणीं अग्निबाणाला कलतें होऊन उपग्रहाला त्याच्या कक्षेंत प्रतिसेकंदाला ५ मैल वा ताशीं १८००० मैल इतक्या वेगानें सोडावें लागेल. हें सर्व यशस्वी झालें तरच तो उपग्रह पृथ्वीभोंवतीं भ्रमण करूं लागेल. सेकंदाला ५ मैल फिरणारा हा उपग्रह पृथ्वीभोंवतीं प्रतिदिनीं १६ प्रदक्षिणा सहजच घालूं शकेल.

या उपग्रहांच्या भ्रमणाच्या कक्षा वर्तुळाकार न राहतां कांहींशा लंब-वर्तुळाकार राहतील. या कक्षांचे पृथ्वीपासून सर्वांत दूर असणारे बिंदू १००० मैलांवर तर नजीकांत नजीक असणारे बिंदू २०० मैलांवर असतील. जवळचे बिंदू यापेक्षां जवळ आले तर उपग्रह पृथ्वीच्या वातावरणांत गुरफटला जाऊन कक्षाभ्रष्ट होईल. अवकाशांत उल्कावृष्टि होऊन वा इतरहि कांहीं अडथळयांमुळें हा उपग्रह कक्षा-विचलित होईल. तत्काळ गुरुत्वाकर्षणाची ताकद वाढून तो महान् वेगानें पृथ्वीकडे खेंचला जाईल व पृथ्वीच्या वातावरणांशी घर्षण होऊन नष्ट होऊन जाईल. पण जर कोणताहि अडथळा आला नाहीं व त्याच्या भ्रमणाचा वेग कायम राहिला तर आकाशस्थ ग्रहांप्रमाणें अनंतकाळपर्यन्त हा उपग्रह पृथ्वीभोंवतीं घिरट्या घालीत राहूं शकेल.

यांची कांहींशी प्रचीति रशियानें अवकाशांत सोडलेल्या ( बालचंद्र ) " स्पुटनीक " या कृत्रिम उपग्रहानें गेले कित्येक दिवस भ्रमत राहून दिली आहे.

## रशियन 'बालचंद्र'

हा रशियन बालचंद्र २३ इंच व्यासाचा व १८५ पौंड वजन असलेला एक गोल गोळा आहे. त्याच्या कक्षेची सामान्य उंची जास्तींत जास्त ५६० मैल असावी व त्याच्या भ्रमणाचा वेग १६००० मैल (प्रति तास) असावा. त्याची भ्रमण-कक्षा विषुववृत्ताशीं ६५ अंशाचा कोन करणारी असावी. त्याचें कवच मॅग्नेशियम धातूचें असावें व त्यावर ॲल्युमिनियमचा चकचकीत थर असावा. त्याला कक्षेंत भिरकावून देणारा तिसऱ्या टप्प्याचा अग्निबाण बहुधा परमाणु-शक्तीवर संचलित केलेला असावा. त्याच्या कवचाच्या आंत अवकाशांतील परिस्थितीची माहिती पृथ्वीवर पाठविण्यासाठीं बॅटरीच्या साहाय्यानें चालणारा बिनतारी संदेश प्रक्षेपक व कदाचित् बिनतारी छायाचित्र प्रक्षेपक असावा. प्रतिसेकंदाला २०.००५ व ४०.०२ मेगॅसायकल्स लहरींवर किंवा १५ व ७.५ मिटर तरंगांतरावर त्याच्याकडून येणारे संदेश दर तीन सेकंदांनीं नोंदले जात आहेत. साध्या डोळयांनीं जरी तो दिसत नसला तरी उषःकालच्या वा सायंकाळच्या संधिप्रकाशांत सामान्य दूरदर्शकांतून तो पहातां येईल. ही सर्व माहिती केवळ अंदाज या स्वरूपाची आहे. कारण रशियाचें यासंबंधांतलें कार्य गुप्ततेच्या आंवरणांत गुंडाळलेलें आहे.

परन्तु माहिती जरी पुरेशी नसली तरी रशियाच्या या यशस्वी 'स्पटनीक'नें रशियन शास्त्रज्ञ व तंत्रज्ञ, यंत्रविशारद व विश्वसंचारज्ञ यांच्या प्रगतीची, कौशल्याची व कर्तृत्वाची एकदम साऱ्या जगाला कल्पना दिली. कांहीं दिवसापूर्वीं रशियानें भू-खंडें उल्लंघून अचूक मारा करणाऱ्या अस्त्राचा यशस्वी प्रयोग केल्याची माहिती जाहीर








केली होती. ती बातमी या उपग्रहाच्या प्रयोगानें एकदम संशयातीत विश्वसनीय ठरली आहे. अशा रीतीनें अमेरिकेच्या आधीं कित्येक महिनें व अमेरिकेच्या अपेक्षित उपग्रहापेक्षां सुमारें आठपट वजनदार असा उपग्रह सोडून रशियानें विश्वसंचाराच्या प्रयोगांची मुहूर्तमेढ तर रोवलीच आहे. शिवाय, दूर अंतरामुळें प्रगूढतेच्या धुक्यांत गुरफटलेल्या विशाल विश्वाच्या नव्या क्षेत्रांत प्रत्यक्ष पदार्पण करून संशोधनार्थ नवीं भांडारें खोलण्याचा मार्ग, पृथ्वीवरच्या संशोधकांसाठीं, उजळला आहे.

जुलै १९५७ मध्यें सुरू झालेल्या आंतरराष्ट्रीय भूभौतिक वर्षांतील एका उपक्रमाची सुरुवात म्हणून हा उपग्रह सोडण्यांत आल्याचें रशियन शास्त्रज्ञ सांगत आहेत. यानंतर सुमारें सव्वा वर्षाच्या काळांत आणखी कित्येक उपग्रह पृथ्वीभोंवतीं सोडण्यांत येतील असें रशिया व अमेरिका यांनीं जाहीर केलें आहे. चंद्रावर स्वारी करण्याच्या प्रयोगाचा पहिला टप्पा म्हणून हा उपग्रह सोडलेला आहे असेंहि रशियन शास्त्रज्ञ सांगत आहेत. अर्थात् यांतील सत्याचा भाग केवळ काळच ठरवूं शकेल. पण भविष्यकाळांत करावयाच्या वैश्विक ज्ञान संपादनाच्या अनेक नवनवीन प्रायोगिक योजनांना या उपग्रहामुळें जोरदार चालना मिळेल हें मात्र निर्विवाद आहे.

### भावी प्रयोगासाठीं उपयुक्त माहिती

प्रथमच अवकाशांत सोडलेल्या उपग्रहांना पुढच्या प्रयोगांना उपयुक्त होणारी खूपच विविध प्रकारची माहिती पृथ्वीवर शास्त्रज्ञांकडे पोंचवावी लागेल. अवकाशांत सूर्यप्रकाशांत वस्तूंचें कमाल उष्णतामान किती राहील, पृथ्वीच्या सांवलींत ती वस्तु किती वेळांत थंड होईल, कॉस्मिक किरण त्या वस्तूच्या मार्गांत कितीसे येतील, सूक्ष्म उल्कांचा कितपत वर्षाव त्या वस्तूवर होईल इत्यादि माहिती या उपग्रह मालिकेंतल्या कोलंबसाला मिळवावी लागेल. या माहितीचा उपयोग करून दुसरे अनेक उपग्रह अवकाशांत सोडले जातील. ते वातावरणांतील दाब, तपमान, आणि घनता यांची माहिती देतील. वातावरणांत ओझोन नांवाचा एक वायु आहे. त्याच्या कृपेनें सूर्याकडून येणाऱ्या अतिनील किरणांपासून मनुष्यांचा बचाव ( अंधत्वापासून ) होतो. पण त्या ओझोनमुळें पूर्ण सूर्य पृथ्वीवरून दिसूं शकत नाहीं. या उपग्रहाला वातावरणाबाहेरून सूर्याचीं-पूर्ण सूर्याचीं-छायाचित्रें घेतां येतील व सूर्याकडून येणाऱ्या सर्व प्रकारच्या प्रकाशलहरींची माहिती मिळूं शकेल. आकाशांत संपूर्णतः काळोख कधींच नसतो. एक प्रकारचा संधिप्रकाश आकाशांत कायम असतो. त्याचाहि अभ्यास करतां येईल. पृथ्वीवरील आकाशवाणी केंद्रांनीं प्रक्षेपित केलेल्या लहरी वातावरणाच्या अगदीं वरच्या विद्युत् प्रभारित अशा थरांतून ( आयोनॉस्फीअर ) परावर्तित होऊन परत पृथ्वीवरील विविध ठिकाणीं येत असतात. बिनतारी प्रक्षेपणाच्या दृष्टीनें या थराचें महत्त्व फार आहे. त्यासाठीं या थरांतील आयनस्, विद्युदणु या विद्युत् प्रभारित कणांची घनता, इत्यादि माहिती मिळवितां येईल. वरच्या थरांतील विद्युत् प्रवाहांचें संशोधन व मापन मॅग्नेटॉमिटरनें करून पृथ्वीच्या चुंबकीय क्षेत्राचा अधिक अभ्यास करतां येईल. पृथ्वीच्या वातावरणाबाहेरील तिच्या चुंबकीय क्षेत्राचा, सूक्ष्म उल्काकणांचा, उच्च थरांतील धूलिकण, उदजनाचें अणु, परमाणु व आयन यांची घनता, ध्रुव प्रदेशांतील रात्रीचे प्रकाशझोत, सूर्यावरील डाग, कॉस्मिक किरण इत्यादि नाना तऱ्हेच्या उपयुक्त गोष्टींचें सम्यक् ज्ञान ( बिनतारी संदेशांनीं ) मिळविण्याची सोय होईल.

### पुनःप्रवेशाचा प्रश्न

हे उपग्रह कक्षाभ्रष्ट होऊन ज्यावेळीं पृथ्वीकडे येऊं लागतील त्यावेळेचा अंदाज त्यांच्या वेगांतील सूक्ष्म फरकावरून शास्त्रज्ञांना अगोदरच घेतां येईल. प्रत्यक्ष ज्यावेळीं पृथ्वीच्या वातावरणांत हे उपग्रह जेव्हां पुनः प्रवेश करतील त्यावेळच्या परिस्थितीचें सूक्ष्म रीतीनें निरीक्षण शास्त्रज्ञांना करावें लागेल.

कारण जरी हे उपग्रह वातावरण-प्रवेशांत प्रचंड वेगानें होणाऱ्या घर्षणानें भस्मीभूत होऊन गेले तरी भविष्यकाळांतील उपग्रह व अखेरीस विश्वसंचारी जहाजांचें या नाशापासून संरक्षण करावें लागेल. त्याची निश्चित योजना शास्त्रज्ञांना विचारपूर्वक आंखावी लागेल. वातावरणांतून बाहेर जाणें जरी अग्निबाणाच्या वाहनाला सहज शक्य असलें तरी विश्वसंचारानंतर परत पृथ्वीप्रवेश करणें हें एक दुर्घट कार्य आहे. पृथ्वीच्या उंबरठ्यावरच हें संचारी नष्ट होऊन जाण्याची शक्यता फार आहे. ती टाळणें हें फारच अगत्याचें आहे. म्हणून "पुनः प्रवेशा"चा प्रश्न शास्त्रज्ञांना अत्यंत विचारपूर्वक सोडवावा लागणार आहे. आणि हीच यापुढील संशोधनाची समस्या ठरणार आहे.

भविष्यकाळांत अवकाशांत भ्रमणाऱ्या उपग्रहांच्या कक्षा वेगवेगळ्या अंतरावर व कोनांत असणेंहि उपयुक्त ठरणार आहे. ध्रुव प्रदेशावरून जाणाऱ्या कक्षेंतील उपग्रह जगांतील सर्व देशांवरून दररोज अनेकदां घिरट्या घालूं शकेल. त्यामुळें त्याचें लष्करी दृष्टीनें फार महत्त्व राहील. या उपग्रहाकडून, वातावरणांतील ढग तयार होण्याच्या क्रियेचें बिनतारी छायाचित्रण सतत करण्याची सोय केली, तर हवामानखात्याला हवामानाचे अंदाज करण्यांत खूपच मदत देतां येईल. पृथ्वीपासून २२,५०० मैलांवरच्या कक्षेंतील उपग्रह विषुववृत्ताच्या भोंवतीं २४ तासांत एक चक्कर मारूं शकेल. म्हणजे त्याची गति पृथ्वीइतकीच राहील व तो जणूं काय स्थिर असल्याचा भास होईल. सूर्यशक्तीचा उपयोग करतां आला तर आंतरराष्ट्रीय दूरवाणी व दूरचित्रण यासाठीं "रिले स्टेशन" म्हणून त्याचा उपयोग करणें शक्य होईल. ध्रुव प्रदेशांवर मिनिटाला २७६ मैलांच्या वेगानें फिरणारे तीन उपग्रह ६०० मैल उंचीवरच्या कक्षेंत आठ तासांच्या अंतरानें सोडून "अवकाशांतील होकायंत्रा" सारखा त्याचा उपयोग होईल, अशी एक कल्पना आहे. याला "ॲस्ट्रो" असें नांव दिलेलें आहे. दर १०५ मिनिटांच्या अंतरानें या ॲस्ट्रोकडून येणारे बिनतारी संदेश पृथ्वीवरील कोणत्याहि ठिकाणीं सर्व प्रकारच्या हवामानांत नोंदले जातील.

कृत्रिम उपग्रहाच्या उपयोगानें चांगल्या दुर्बिणी वापरून पृथ्वीवरील दोन ठिकाणांमधलें अंतर खूपसें अचूक मापतां येईल अशी "फ्रुटो" चे संशोधक प्रो. टॉमबो यांची अपेक्षा आहे. एकाच वेळीं दूरदूरच्या ठिकाणांहून या उपग्रहाचे फोटो घ्यावयाचे व त्यांचेवरून हें अंतर मापन करावयाचें अशी त्यांत कल्पना आहे.

## विश्वसंचाराची पहिली पायरी

विश्वसंचाराची पहिली पायरी म्हणून या उपग्रहाचा उपयोग करतां येईल अशीहि एक अपेक्षा रशियन विश्वसंचारज्ञांनीं प्रगट केली आहे. सध्यांच्या रशियन उपग्रहाची गति सेकंदाला ५ मैल आहे. ती जर ७ मैलापर्यंन्त वाढवितां आली तर चंद्रावर ५ दिवसांत पोचतां येईल अशी रशियन–शास्त्रज्ञ डॉ. डॉब्रोनव्हाव यांची अपेक्षा आहे. कारण चंद्र त्यांतल्या त्यांत पृथ्वीच्या जवळ ( म्हणजे २,३८,८५७ मैल ) आहे. मंगळ व शुक्र या ग्रहांवर जाण्यांस खूपच वेळ लागेल. पृथ्वीच्या वातावरणाबाहेर एक उपग्रहांचा तळ निर्माण करून त्याठिकाणीं परमाणु-शक्तीचा सांठा करून ठेवावा व तेथून वेगवेगळ्या ग्रहांवर स्वाऱ्या कराव्यात अशीहि कल्पना निघालेली आहे. विमानें किंवा आगगाड्या ज्याप्रमाणें मार्गावर इंधनासाठीं थांबतात त्याप्रमाणें विश्वसंचाराला निघालेलीं भविष्यकीलीन जहाजें अवकाशांतून जातांना या उपग्रहांच्या तळातळांवरून आवश्यक तितकी रसद, कुमक व इंधनद्रव्यें घेत घेत आपल्या दूरदूरच्या संचारावर जातील, अनंत विश्वाचा कोपरान् कोंपरा धुंडण्याची मनुष्याची महत्त्वाकांक्षा सफल करतील. अर्थात् यासाठीं कल्पनातीत मोठ्या प्रमाणावर शक्तीचे सांठे करून ठेवावे लागतील, आणि त्यासाठीं अनेक








यांत्रिक व तांत्रिक समस्या सोडवाव्या लागतील. परमाणुपासून शक्ति मिळवितांना त्याच्या पूंजभाराच्या अत्यंत सूक्ष्म अशा हिश्श्याचें शक्तींत रूपांतर होत असतें. पण तरीहि ही शक्ति किती प्रचंड असते ! यावरून अशी कल्पना निघाली कीं, साऱ्याच पूंजभाराचें पूर्णतया शक्तींत रूपांतर करतां आलें तर निर्माण होणारी शक्ति वरील शक्तीच्या हजारों पट प्रचंड असेल. ती या विश्वसंचाराच्या कामासाठीं उपयोगी पडूं शकेल. वायुरुप पदार्थांच्या परमाणूंचें विद्युत् प्रभारित कणांत ( आयनूस ) रूपांतर करून त्या कणांना अत्यंत प्रचंड वेगानें अग्निबाणाच्या शेंपटाकडच्या निमुळत्या तोटींतून निर्वात अवकाशांत सोडून अग्निबाणाचें संचलन करावें अशीहि एक कल्पना रोमिक नांवाच्या शास्त्रज्ञानें काढली आहे. त्याच्या अंदाजाप्रमाणें १००० टन वजनाच्या विश्वसंचारी जहाजांत केवळ ११·६ पौंड इतकेंच इंधन प्रत्येक तासाला खर्च होईल. अशा रीतीनें जास्तींत जास्त प्रतिसेकंदाला २६ मैल किंवा दिवसाला २,२७०,००० मैल इतका वेग वाढवितां येईल. अशा वेगवर्धनाच्या योजना आहेत. अंतिम उद्दिष्ट प्रकाशाच्या इतका वेग गांठणें हें आहे. ( प्रकाशाचा वेग सेकंदाला १,८६,००० मैल इतका आहे. ) या वेगाच्या जवळपासचा वेग गांठला तर सापेक्षता सिद्धान्ताप्रमाणें वेगांतील स्थल व काळाच्या कल्पनेचे अर्थच बदलावे लागतील. या वेगानें जाणाऱ्या जहाजांतल्या लोकांना वाटेल आपण फक्त १ वर्षच पर्यटन करतों आहों पण पृथ्वीवरच्या त्यांच्या नातेवाईकांना पृथ्वीवरील कालमानाप्रमाणें त्यांचा विरह ८।१० वर्षें सोसावा लागेल. अर्थात् हे सारे अंतिम पायरीचे प्रश्न आहेत. सध्यां तरी त्यांत कल्पना-विलास व स्वप्नरंजनाचा भाग बराच आहे. " सध्यां तरी" म्हणण्याचें कारण शास्त्राच्या प्रगतीची झेंप प्रचंड वेगाची आहे. कल्पना आणि वस्तुस्थिति यांतील अंतर शास्त्रीय प्रगतीच्या जगतांत दिवसेंदिवस कमी कमी होत चाललें आहे. परमाणु शक्तीच्या व रशियन उपग्रहाच्या उदाहरणावरून तर असें दिसून येतें कीं, थोड्याच वर्षांपूर्वी असंभाव्य वाटणाऱ्या गोष्टी आज वास्तविक ठरल्या आहेत. आजचें स्वप्न थोड्याच वर्षांत सत्य ठरणें अगदींच असंभाव्य नाहीं.

कृत्रिम यंत्रांपेक्षां कितीतरी अधिक माहिती प्रत्यक्ष निरीक्षणानें मनुष्यप्राणी देऊं शकेल. यासाठीं या विश्वसंचारी जहाजांवरून मनुष्यप्राण्यांना जातां येईल का ? अवकाशांतील वातावरण व गुरुत्वाकर्षणरहित अशा अवस्थेंत त्यांची बुद्धि, शक्ति विकल होईल का ? संचारी जहाजांच्या महान् वेगांत व विशेषत: वेगवर्धनाच्या ( ॲक्सिलरेशन् ) क्षणांत त्याच्या शारीरिक पेशी संरक्षित राखतां येतील का ? यासाठीं संरक्षणाचे कोणते उपाय योजावे लागतील ? इत्यादि नाना तऱ्हेचे प्रश्न अजून सुटावयाचे आहेत. त्यांची चर्चा हा एक स्वतंत्र विषयच आहे.

आज अवकाशांत ताशीं १६००० मैलांच्या वेगानें रशियन बालचंद्र, त्याला कक्षेंत सोडणारा तिसऱ्या टप्प्याचा अग्निबाण व या दोहोंना एकत्रित ठेवण्यासाठीं वापरलेली निमुळती टोपी या तीन गोष्टींची मिरवणूक दर दीड तासाला पृथ्वीप्रदक्षिणा करीत आहे. त्यांनी सुरू केलेलें " प्रकरण " हें असें आहे. विश्वसंचाराच्या कादंबरीचें हें पहिलें प्रकरण !!

परमाणुशक्तीच्या संशोधनापासून शास्त्रीय शोध व भीति ही जोडगोळी सामान्य मनुष्याच्या मनांत ठाण देऊन बसलेली आहे. पण निदान या उपग्रह प्रकरणांत विनाशक परिमाणांची शक्यता फारच कमी आहे, ही एक विशेष गोष्ट आहे. पुरातन कालापासून मानवी बुद्धीला वेडें करणाऱ्या ग्रहांच्या व ताऱ्यांच्या एका महान् ब्रह्माविषयींची जिज्ञासा अंशत: तृप्त करणारें व वाढविणारें असें हें संशोधन आहे. पुढील पिढ्या याबद्दल या कालखंडांतल्या संशोधकांना नि:संशय धन्यवादच देतील.



अनुक्रमणिका






प्रा. वा. ल. पुरोहित

# कृत्रिम चंद्राचें भूत-भविष्य

रशियन शास्त्रज्ञांनीं नुकताच जो छोटासा कृत्रिम चंद्र 'स्पटनिक' सोडला त्या घटनेचे पडसाद सर्व जगभर उठले; कांहीं अति अद्यावत फलज्योतिषी कुंडलीमध्यें हर्शल, नेपच्यून व प्लूटोप्रमाणें आतां कदाचित या उपग्रहाचाहि समावेश करूं लागतील! अर्थात जर हा उपग्रह इतके दिवस शाबूत राहूं शकला तरच्या या गोष्टी! तेव्हां या उपग्रहाचेंच भूत नि भविष्य पहाणें हा या लेखाचा उद्देश आहे.

'थंडया लढाई' चे दुष्परिणाम इतर क्षेत्राप्रमाणें शास्त्रीय ज्ञानाचे क्षेत्रांत देखील दुर्दैवानें अनुभवास येतात. त्यामुळें प्रस्तुत उपग्रहाच्या वास्तविक स्वरूपाबद्दल रशिया व त्याचे विरोधक अशा दोन्ही पक्षांनीं प्रत्यक्ष वा अप्रत्यक्ष रीत्या भरपूर गैरसमज पसरविले आहेत. एका अमेरिकन वृत्तपत्राची मजल इथपर्यंत गेली कीं त्यांनें असें वृत्त प्रसिद्ध केलें कीं, हा उपग्रह अमेरिकेंतील लष्करी महत्त्वाच्या ठिकाणांचीं सारखी छायाचित्रें घेऊन ती रशियाकडे रेडियोनें प्रक्षेपित करीत आहे! या परिस्थितींत शास्त्रीय दृष्ट्या वा पुराव्याचे आधारें या उपग्रहाबद्दल किंवा अशाच यापुढें होऊं घातलेल्या उपग्रहाबद्दलहि जी कांहीं निश्चित स्वरूपाची माहिती उपलब्ध आहे ती या लेखांत देण्याचें योजलें आहे.

## विमानें व उपग्रह

अशा तऱ्हेचे उपग्रह, रॉकेट किंवा अग्निबाण यांच्या साहाय्यानें आपल्या कक्षेंत सोडावे लागतात. साधीं पंख्यावर चालणारीं विमानें चालण्याला हवेची आवश्यकता असते. एकतर विमानाच्या इंजिनमधल्या इंधनाचे ज्वलनानेंच गति निर्माण होत असते. त्या ज्वलनाला लागणारा प्राणवायू हवेंतूनच घेतला जातो. दुसरी गोष्ट म्हणजे स्थूल मानानें असें म्हणतां येईल कीं, पाण्यांत पोहतांना ज्याप्रमाणें आपण पाणी हातानें मागें ओढतो व त्याच्या योगानें पुढें सरकूं शकतों त्याप्रमाणेंच या विमानांची गति सिद्ध होते. अर्थात जेथें हवा नाहीं अशा ठिकाणीं गति निर्माण करण्याला या विमानांचा कांहींच उपयोग करतां येणार नाहीं.

आपला उपग्रह जर चिरकाल फिरत रहावा अशी आपली इच्छा असेल तर तो उपग्रह वातावरणाच्याहि पलीकडे नेला जाणें आवश्यक आहे. नाहींतर वातावरणाच्या घर्षणानें त्याची गति झपाट्यानें कमी होत जाईल. त्याचप्रमाणें घर्षणजन्य उष्णतेनें तो जळून जाईल हाहि एक धोका आहेच. परंतु अशा निर्वात प्रदेशांत आपला उपग्रह नेऊन पोहोंचविण्याला साध्या विमानांचें तत्त्व उपयोगी पडणार नाहीं. म्हणून हें कार्य रॉकेट किंवा अग्निबाण यांचें साहाय्यानें केलें जातें.

दिवाळींत आपण जो दारूचा बाण उडवितों त्याची व या रॉकेटची कार्यपद्धती पूर्णपणें एकच आहे. फरक इतकाच कीं, बाणापेक्षां हें रॉकेट अनेकपट सामर्थ्यवान असतें.

## न्यूटनचें गतिशास्त्र

न्यूटनच्या तिसऱ्या गतिविषयक नियमान्वयें आपणाला हें माहीत आहे कीं, प्रत्येक 'क्रियेला' तितक्या जोराची पण विरुद्ध दिशेची 'प्रतिक्रिया' होत असते. उदाहरणार्थ, जितक्या जोरानें बंदुकींतून गोळी पुढच्या दिशेनें सुटते तितक्याच जोरानें बंदुक मागें हिसका घेते. याचप्रमाणें बाणातून दारूच्या ज्वलनानें निर्माण झालेले वायू वेगानें खालच्या दिशेनें बाहेर पडतात. त्याची प्रतिक्रिया म्हणून बाण तितक्याच जोरानें वर रेटला जातो. या ज्वलनाला लागणारा प्राणवायू दारूतील रसायनापासूनच मिळत असतो. व ही 'क्रिया-प्रतिक्रिया' पोकळींत देखील होऊं शकते. म्हणजे या तत्त्वाच्या उपयोगानें आपणाला निर्वात प्रदेशांत देखील एखाद्या पदार्थाला गति देतां येईल. म्हणूनच सर्व कृत्रिम उपग्रह (व त्यांचीं छोटी भावंडें म्हणजे नवीन निघालेलें स्वयंचलित दूरगामी रॉकेट बॉम्ब-जे अत्यंत विरल हवेंतून आपला बहुतेक प्रवास करतात) रॉकेटच्या साहाय्यानेंच उडविणें आवश्यक आहे.

ऐतिहासिक दृष्टीनें पाहतां अग्निबाणांचा शोध प्रथम चिनी लोकांनीं लावला. परंतु सध्यांच्या प्रचंड शक्तीच्या रॉकेटबद्दल महत्त्वाचें संशोधन गेल्या महायुद्धांत जर्मन लोकांनीं केलें. व त्यांतूनच त्यांच्या कुप्रसिद्ध 'व्ही २' या अस्त्राचा जन्म झाला. व्ही २ अस्त्रांत थोडाबहुत फरक करूनच रॉकेट बनविलें आहे. असें म्हटलें असतां अतिशयोक्ति होणार नाहीं. आणि म्हणून या व्ही २ च्या रचनेचा थोडाबहुत विचार करणें योग्य होईल

## व्ही २ व सध्यांचीं रॉकेट्स्

या रॉकेटचें एकूण वजन १३॥ टन होतें. मद्यार्क (८७५० पौंड) व द्रव्यरूप प्राणवायू (११००० पौंड) यांचा त्यांत इंधन म्हणून उपयोग केला होता. मद्यार्काचें ज्वलन होतांना २८००° सें. चें कमाल तपमान निर्माण होई. या तऱ्हेनें ६५०००० अश्वशक्तीपेक्षां अधिक शक्ति निर्माण होई. अशा तऱ्हेनें प्रचंड शक्तीनें फेंकल्या गेलेल्या या अस्त्राचा वेग वातावरणाच्या बाहेर गेल्यानंतर ताशीं ३६०० मैलपर्यन्त असे. पृथ्वीच्या पृष्ठभागावर सुमारें ११८ मैल उंचीपर्यन्त तें जाऊं शके. आणि यासाठीं मद्यार्काचें ज्वलन फक्त सुमारें ६७ सेकंद चाले! रॉकेट परत खालीं पडतांना हवेशीं होणाऱ्या घर्षणामुळें त्याचें तपमान ७५०° सें. पर्यंत चढत असे. रॉकेटची दिशा कायम राखणें, योग्यवेळीं जरूर त्या झडपा उघडणें वा मिटणें या गोष्टी स्वयंचलित यंत्रानीं होत किंवा रडारच्या मदतीनें करतां येत. एवढ्या प्रचंड गतिमध्यें व उष्णतेमध्यें तग धरण्यासाठीं रॉकेटचे सर्वभाग पुरेसे बळकट व उष्णतारोधक असणें आवश्यक आहे.

सध्यांचीं रॉकेट्स् याच व्ही २ ची सुधारलेली आवृत्ती होत. मुख्यतः या सुधारणांत (१) रॉकेटचे मुख्य आवरणासाठीं खास हलक्या मिश्र धातूंचा उपयोग (२) मद्यार्कापेक्षां जास्त प्रभावशाली मिश्र इंधनें व (३) टप्प्यांनीं लागोपाठ उडणारे बाण यांचा प्रामुख्यानें उल्लेख केला पाहिजे. प्रचंड उंचीपर्यंत कृत्रिम चंद्र जावयाचा असेल तर त्यासाठीं टप्प्यांच्या बाणांची रचना अत्यावश्यक आहे. कारण, एकूण रॉकेटचें वजन जितकें अधिक तितकी तो उंचावर नेण्यास लागणारी शक्ती अधिक. टप्प्यांच्या बाणांचें कार्य थोडक्यांत असें सांगतां येईल. प्रथम रॉकेटमधील एक बाण उडून रॉकेटला कांहीं पूर्वनियोजित उंचीपर्यंत नेतो. या उंचीवर रॉकेट पोहोंचल्यावर त्यांतील दुसरा 'बाण' उडूं लागतो. त्याचवेळीं पहिल्या बाणाचे रॉकेटमधले भाग आतां निरुपयोगी झाल्यानें आपोआप अलग होऊन खालीं पडतात. व राहिलेला रॉकेट अधिक हलका असल्यानें जास्त सुलभतेनें वर जाऊं शकतो. याच गोष्टीची पुनरावृत्ति पुढील टप्प्याला होते. या पद्धतीनें चालणारें अमेरिकेचें २ टप्प्यांचें कार्पोरल हें रॉकेट २५० मैल उंचीपर्यन्त वर चढूं शकलें. अमेरिका सोडणार असलेलें 'व्हायकिंग' व 'व्हँगार्ड' रॉकेट हे तीन टप्प्यांचे असतील. रशियानें सोडलेला चंद्रहि ३ टप्प्यांच्या रॉकेटचा असावा असा सामान्यतः समज आहे.

## अनंतकालचें भ्रमण

आपण सरळ वर फेंकलेली वस्तू गुरुत्वाकर्षणानें परत जेथून फेंकली तेथेंच येऊन पडते. रॉकेट हा ज्यावेळीं स्वयंचलित दूरगामी स्फोटक अस्त्र म्हणून वापरावयाचा असतो तेव्हां त्याच्या उड्डाणाची दिशा योग्य उंचीवर गेल्यानंतर आपोआप बदलण्याची व्यवस्था त्यांत केलेली असते. त्यामुळें हें रॉकेट आपल्या लक्ष्यावर जाऊन पडतें. परंतु कृत्रिम उपचंद्र असा ताबडतोब पृथ्वीवर येऊन पडतां कामा नये. मग तो काय पृथ्वीच्या गुरुत्वाकर्षणाच्या मर्यादेपलीकडे पाठविलेला असतो? त्याला एकसारखा पृथ्वीभोंवतीं फिरत ठेवण्याला कोणत्या साधनानें शक्ती पुरविण्यांत येते? हे दोन प्रश्न कोणाच्याहि मनांत ताबडतोब उभे राहतील.

येथें एक गोष्ट लक्षांत ठेवली पाहिजे कीं, पृथ्वीवरील कोणत्याहि वस्तूला आपण एकदां गति दिली तर ती गति मंद होत होत पूर्णपणें थांबते. असें जें आढळून येतें त्याचें कारण घर्षणामुळें गतीला होणारा विरोध हेंच होय. समुद्रसपाटीच्यावर सुमारें १२० मैलाहून अधिक उंचीवर वातावरण इतकें विरल होतें कीं, तेथें एखाद्या गतिमान पदार्थाला वातावरणाचें होणारें घर्षण व तज्जन्य विरोध जवळजवळ नसतोच असें म्हटलें तरी चालेल. तेव्हां याहून अधिक उंचीवरील एखाद्या पदार्थाला एकदां याहून कांहीं गति दिली कीं, ती गति लवकर मंदावण्याचें कांहीं कारण नाहीं. कारण त्या गतीला कशाचा फारसा मुळीं विरोधच नाहीं. सूर्यमालेंतील हे ग्रह जे अनंतकाल फिरत आहेत त्याचें कारण हेंच कीं, अवकाशांत त्यांच्या गतीला कशाचा विरोध होत नाहीं. तेव्हां कृत्रिम चंद्रालासुद्धां कायम फिरत ठेवण्यासाठीं एकसारखी शक्ती पुरविण्याची जरूरी नाहीं.

वर असें सांगितलें कीं, हा कृत्रिम चंद्र तीन टप्प्यांच्या रॉकेटनें सोडला असावा. यांतील पहिल्या दोन टप्प्यांचे बाण त्याला केवळ जरूर त्या उंचीवर नेण्यासाठीं उपयोगांत येतात. तर शेवटच्या टप्प्याचा बाण त्या चंद्राला पृथ्वीच्या पृष्ठभागाला स्पर्शिकेच्या दिशेनें (Tangential) प्रचंड वेग देतो. न्यूटनच्या पहिल्या



अनुक्रमणिका

गतीच्या नियमानुसार आतां तो चंद्र या स्पर्शिकेच्या दिशेनें सरळ रेषेंत निघून जावयास पाहिजे. परंतु पृथ्वीच्या गुरुत्वाकर्षणामुळें त्याचा मार्ग बदलतो व तो वर्तुळाकार मार्गानें फिरूं लागतो. या वर्तुळाकार गतिसाठीं लागणारा केंद्रगामी जोर ( Centripetal force ) हा गुरुत्वाकर्षणानें पुरविला जातो.

केंद्रगामी जोराची किंमत वर्तुळाकार गतीच्या वेगावर ( व वर्तुळाच्या त्रिज्येवरहि ) अवलंबून असते. हा वेग बरोबर पाहिजे तितका असेल तर गुरुत्वाकर्षणाचा सर्वच्या सर्व जोर केंद्रगामी जोर म्हणून खर्ची पडतो. मग चंद्राला खालीं पडणें भाग पाडण्याला गुरुत्वाकर्षणापैकीं कांहींच जोर शिल्लक रहात नाहीं. आणि या परिस्थितींत तेवढ्याच उंचीवरून हा चंद्र कायम फिरत राहील. जरूरीपेक्षां चंद्राचा वेग कमी किंवा जास्त झाला तर तो पृथ्वीच्या जवळ येईल किंवा पृथ्वीपासून दूरहि जाईल. पृथ्वीपासून किती अंतरावरून त्याचें भ्रमण होईल हें त्याच्या वेगावरच अवलंबून राहील. सांप्रतचा कृत्रिम चंद्र ज्या उंचीवरून फिरत आहे तेथें कदाचित अत्यंत विरळ स्थितींत थोडी हवा असण्याचा संभव आहे. तसेंच सूक्ष्म प्रमाणांत उल्कांपासून बनलेले धूलिकणहि तेथें असणार. त्यामुळें या कृत्रिम चंद्राच्या गतीला अगदीं सूक्ष्म प्रमाणांत कां होईना घर्षणजन्य विरोध होणारच. म्हणून त्याचा वेग प्रथम अगदीं हळू कमी होत जाईल व तो पृथ्वीच्या हळूंहळूं जवळ येत जाईल. जसजसा तो जवळ येईल तसतसा हा विरोध वाढत्या प्रमाणावर होऊं लागेल व पुढें पुढें तो फारच झपाट्यानें खालीं येऊं लागून शेवटीं घर्षणजन्य उष्णतेनें उल्कांचे प्रमाणेंच जळून जाईल ! परंतु शेवटीं तो जळून न जातां त्यांतील छायाचित्रें वगैरे शाबूत स्थितींत परत मिळवितां येतील अशी कांहीं योजना रशियन शास्त्रज्ञानीं केलेली असावी असें त्यांच्या पत्रकावरून दिसतें. परंतु संकल्पित अमेरिकन कृत्रिम चंद्राला अशा तऱ्हेनें परत मिळविण्याची कोणतीहि योजना अमेरिकनांचें जवळ नाहीं.

अर्थात् ज्या उंचीवरून हा चंद्र फिरावा अशी इच्छा असेल तेथपर्यंत तो पहिल्या एक वा अधिक बाणांनीं पोहोंचावा व शेवटच्या बाणाचे योगानें या उंचीला योग्य अशी स्पर्शिकेच्या दिशेची गति त्याला मिळावी अशी पूर्वयोजना करणें जरूर आहे. अर्थात् चंद्राचें वजन रॉकेटच्या गतीला वेगवेगळ्या उंचीला होणारा वातावरणाचा विरोध या गोष्टी लक्षांत घेऊन वेगवेगळ्या टप्प्यांच्या बाणांत आवश्यक तेवढ्या इंधनाचा पुरवठा ठेवला पाहिजे. यासाठीं वाऱ्याच्या झोंतांमधील ( Wind Tunnel ) प्रयोग, व पूर्वीचे रॉकेट उडविण्याचे प्रयोग यापासून मिळालेली माहिती व गणित यांचा उपयोग करावा लागतो.

## पृथ्वीविषयीची अपुरी माहिती

इतक्या विवेचनावरून हें लक्षांत आलेंच असेल कीं, हा कृत्रिम चंद्राचा प्रयोग फार गुंतागुंतीचा व खर्चाचा आहे. साहजिकच असा प्रश्न येतो कीं, या प्रयोगाचे पाठीमागें पुढारलेली राष्ट्रें आज कां लागलीं आहेत ? एक तर मनुष्याची विजिगिषु वृत्ती नेहमी पराक्रमाचीं नवनवीं क्षितिजें शोधीत असते व शेवटीं अशा तऱ्हेच्या विक्रमांतून अनेकदां कांहीं उपयुक्त माहिती बाहेर पडते असे अनेक दाखले आहेत. पृथ्वीवरून चालणाऱ्या मानवाचें आतां नुसत्या अंतरिक्षांत भराऱ्या मारून समाधान होत नाहीं. अवकाशांतून चंद्र व इतर मंगळासारखे ग्रह यावर फेरफटका मारून येण्याच्या महत्त्वाकांक्षेनें आतां तो भारला गेला आहे. असला प्रवास हा तूर्त तरी शाब्दिक व अलंकारिक अर्थानेंहि दूरचा पल्ला आहे.

आपली पृथ्वी व तिच्या संबंधींच्या कांहीं गोष्टींबद्दलची आपली सध्यांची माहिती शास्त्रज्ञांना अजून समाधानकारक वाटत नाहीं. ही माहिती मिळवून आपल्या ज्ञानांतील ही एक महत्त्वाची उणीव भरून काढण्यासाठीं सर्व राष्ट्रांनीं मिळून चालू वर्ष ' आंतरराष्ट्रीय भूभौतिक वर्ष ' म्हणून पाळण्याचें ठरविलें आहे. आजवर न सुटलेल्या पृथ्वीविषयक अनेक समस्यांचा उलगडा करण्याचा प्रयत्न या वर्षांत होणार आहे. त्यांचाच एक भाग म्हणून कांहीं कृत्रिम चंद्र सोडण्याचा प्रयोग करण्याचें अमेरिका व रशिया यांनीं अंगावर घेतलें आहे. या योजनेप्रमाणें अमेरिका आपला उपग्रह जुलैमध्यें सोडणार होती. परंतु तो सोडल्यानंतर त्याच्या निरीक्षणाची तरतूद न झाली तर त्यापासून मिळवितां येणाऱ्या कांहीं माहितीला आपण मुकूं या सबबीवर त्यांनीं ती योजना डिसेंबरपर्यंत व नुकत्याच झालेल्या प्रकटनाप्रमाणें मार्च १९५८ पर्यंत पुढें ढकलली आहे. रशियानें याबाब-








तच्या आपल्या योजना १० जूनलाच जाहीर केल्या होत्या. तेव्हां सध्यांचा रशियन उपग्रह शास्त्रीय नियतकालिकें वाचणारांना तरी अगदींच अनपेक्षित नव्हता.

परंतु एकंदर सार्वत्रिक समज असा झाला कीं, या प्रयोगाचें तंत्र पूर्णपणें अवगत न झाल्यानेंच अमेरिकेनें आपला कार्यक्रम पुढें ढकलला. आणि पश्चिमी राष्ट्रें व त्यांच्या चष्म्यांतून पहाणारे भारतांतील अनेक लोक यांच्या मनांत असा एक गंड घर करून राहिलेला आहे कीं, 'शास्त्रीय प्रगतींत रशिया अमेरिकेपेक्षां मागासलेला आहे.' तेव्हां जें अमेरिकेला शक्य नाहीं तें रशिया काय करूं शकतो ? या कल्पनेंत दंग असलेल्या लोकांना मात्र रशियन चंद्रानें चांगलाच धक्का दिला आहे.

## उपग्रहापासून अपेक्षा

अशा तऱ्हेच्या प्रयोगापासून पुढील शास्त्रीय माहिती मिळविण्याची अपेक्षा आहे. (१) वातावरणाची निश्चित उंची व वेगवेगळ्या उंचीवरील वातावरणाच्या थरांचें विशिष्ट गुरुत्व. (२) फार उंचावरून जाणाऱ्या रॉकेटसारख्या वाहनांना होणारा घर्षणजन्य विरोध. (३) आयनोस्फिअर* मधील फेरबदल व त्याचा रेडिओ संदेशावर होणारा परिणाम. (४) 'विश्वकिरण' (कॉस्मिक रेज्) वातावरणांत आल्यानंतर खूपच बदलून जातात. म्हणून वातावरणांत येण्यापूर्वींचें त्यांचें मूल स्वरूप समजून घेणें. (५) पृथ्वीचा आकार निश्चित करणें. (६) पृथ्वीवरून हा उपग्रह कितपत दिसूं शकतो व त्याची छायाचित्रें घेतां येतात हें पाहणें. त्यावरून पृथ्वीच्या निरीक्षणासाठीं साधन म्हणून अशा उपग्रहाचा कसाकाय उपयोग होईल हेंहि समजेल. अर्थात याचें लष्करी महत्त्व उघडच आहे. (७) सूर्यापासून आपल्याकडे येणाऱ्या क्ष किरण, अतिनील किरण व विद्युतभारित कण यांचें मापन करणें. (८) उत्तर व दक्षिण ध्रुवप्रदेशांत दिसणाऱ्या 'आरोरा' प्रकाशांची कारणमीमांसा करणें. (९) पृथ्वीच्या चुंबकीय शक्तीमधील फेरफार अभ्यासणें. (१०) वरील थरांतून धूमकेतूंचे पासून बनलेली धूळ व उल्का यांचें मापन करणें वगैरे वगैरे.

## गुप्तता व तर्कवितर्क

या सर्व बाबतीत मिळणारी माहिती राष्ट्राराष्ट्रांनीं एकमेकांना पुरवावी असा करार आहे. उपग्रहाचे वेध सर्व जगभर घेतले जातील व एकमेकांस कळवले जातील. अशा वेध घेण्यासाठीं हिंदुस्थानांत नैनिताल येथील वेधशाळेंत खास तयारी केली जात आहे. यावरून हें लक्षांत येईल कीं, उपग्रहापासून मिळणारी माहिती सर्व मानवजातीला खुली रहाणार आहे. अर्थातच लष्करीदृष्ट्या उपयुक्त ठरेल अशी माहिती व उपग्रह सोडण्याबद्दलच्या तांत्रिक व्यवस्था या बाबतींत गुप्तता राखली जाण्याचा प्रयत्न सद्यः स्थितींत अपरिहार्य आहे. आणि या गुप्ततेच्या प्रयत्नापोटीं अनेक परस्पर विरोधी तर्ककुतर्कांना कसा वाव मिळतो हें सर्वांच्या पहाण्यांत आहेच. त्यांत पुन्हां थंड्या लढाईतील पांचपेंचांची व प्रचाराची भर. त्यामुळें सत्य काय हें समजणें दुर्घट आहे.

उदाहरणार्थ, रशियन प्रकटनाप्रमाणें त्यांच्या उपग्रहाचें वजन सुमारें १८५ पौंड आहे. तर कांहीं अमेरिकन लोकांनीं यांत दशांश चिन्हाची चूक असून बहुधा हें वजन १८.५ पौंडच असावें असें जाहीर केलें. कारण काय तर अमेरिकेचा संकल्पित चंद्र फक्त २० पौंड वजनाचा असणार आहे. व त्याहून इतका अधिक वजनाचा चंद्र रशिया कसा सोडूं शकेल !

या उपग्रहावरून येणारे रेडिओ संदेश केवळ त्याचे वेध रेडिओ यंत्रानें घेतां यावे यासाठीं आहेत. (दुर्बिणीपेक्षां ही गोष्ट रेडिओ यंत्रानीं जास्त सुलभतेनें करतां येते. त्याचप्रमाणें तपमानाचे वगैरे रेकॉर्डहि त्यानें पाठविले जात आहेत.) असें रशियनांचें म्हणणें आहे. अमेरिकन कल्पनेप्रमाणें हा उपग्रह सांकेतिक भाषेंत कांहीं लष्करी महत्त्वाची गुप्त माहिती पुरवत असला पाहिजे असा तर्क करून या गुप्त भाषेचा उलगडा करण्याच्या खटाटोपांत अमेरिकेंतील सांकेतिक लिपींचे श्रेष्ठ तज्ज्ञ गुंतले आहेत.

या चंद्राचें भ्रमण सुरूं झाल्यापासून तिसऱ्याच दिवशीं त्याच्यांतील विजेरी संपुष्टांत आली असल्यानें रेडिओ संदेश अगदीं अस्पष्ट येऊं लागले असा

---

* पृथ्वीच्या पृष्ठभागावर ६० मैलाहून अधिक उंचीवर असलेले विद्युतभारित वायुकणांचे थर. रेडिओलहरी यापासून परावर्तित होऊन परत खाली येतात. दूरचीं 'शॉर्टवेव्ह स्टेशन्स्' यामुळेंच ऐकूं येतात.



अनुक्रमणिका

पुकारा झाला व लवकरच ते बंद पडतील असा अंदाजहि व्यक्त करण्यांत आला. परंतु संदेश आजपर्यन्त येत आहेतच ! या कृत्रिम चंद्राच्या आयुष्याबद्दलहि कांहीं तासापासून तों कांहीं वर्षांपर्यन्त अनेक अंदाज प्रसिद्ध झाले आहेत. या अंदाजांत तफावत पडण्याचें कारण मुख्यतः हा उपग्रह ज्या ठिकाणीं फिरत आहे तेथल्या परिस्थितीबद्दल सध्यां तरी कांहींच माहिती उपलब्ध नाहीं. मात्र या ग्रहाच्या निरीक्षणावरून यापुढील उपग्रहाचे बाबतीत हे अंदाज अधिक बिनचूक येतील व नंतर त्याला गणिताचा बिनचूकपणा येऊं शकेल.

**परत येण्याची योजना**

मात्र वर उल्लेख केलेल्या रशियन पत्रकानुसार कृत्रिम चंद्राचें परत येतानाचें तपमान, ज्वलन बिंदूला पोहोंचण्याच्या बरेंच अगोदर कांहीं उपायानें ते चंद्र सुरक्षित स्थितींत पृथ्वीवर आणण्याची त्यांची योजना असावी असें वाटतें. कारण त्या चंद्रांत अतिनील व क्ष किरणांचे फोटो घेण्याची योजना असून या छायाचित्रापासून त्याबाबत माहिती मिळेल असें त्यांनीं जाहीर केलें आहे. कदाचित तपमानानें किंवा रेडिओ-संदेशानें उडणारें आणखी एकादें रॉकेट त्याला परत पृथ्वीवर आणण्यासाठीं त्यांत ठेवलें असण्याची शक्यता आहे. मात्र या योजनेचा पाश्चात्यांना अद्याप पत्ता लागलेला नाहीं. पाश्चात्यांच्या कृत्रिम चंद्राच्या योजनेंत तो परत पृथ्वीवर आणतां येईल ही गोष्ट गृहीतच धरलेली नाहीं. तेव्हां सध्यांच्या कृत्रिम चंद्राचा शेवट जळून जाण्यानें तरी होईल किंवा ही रशियन योजना सिद्धीला गेली तर तो परत पृथ्वीवर येण्यांत तरी होईल; मात्र ही गोष्ट नक्की केव्हां होईल हें आज कोणालाच सांगतां येणार नाहीं.

सध्यांच्या कृत्रिम चंद्राबद्दल पुढील माहिती बरीच निश्चित म्हणून सांगतां येईल. सुमारें १८४ पौंड वजनाचा तो एक पोकळ चेंडूसारखा गोळा असून त्याला, रेडिओसंदेश प्रक्षेपणासाठीं दोन 'एरियल' लाविलेले आहेत. तो पृथ्वीप्रमाणेंच स्वतःभोंवतीं फिरून पुन्हां पृथ्वीभोंवतीं तासीं १८००० मैल वेगानें लंबवर्तुळाकार मार्गानें फिरत आहे. त्याच्या भ्रमणाची कक्षा विषुववृत्ताशीं ६५ अंशाचा कोन करीत आहे. या भ्रमणांत तो पृथ्वीपासून कमीत कमी १७० मैल व जास्तीत जास्त ५७० मैल अंतरावर असतो. त्याच्या आंतील दोन रेडिओ ट्रॅन्समिटर्स ७·५ व १५ या मीटर्सवर कांहीं संदेश देत आहेत. या द्वारें तो वरील भागांतील तपमान, विद्युतभारित कण व त्याच्यावर आपटणारे उल्कांचे तुकडे याबद्दल माहिती देत असण्याची शक्यता आहे. तसेंच याशिवाय फोटोग्राफिक साधनांनीं अतिनील व क्ष किरणांबद्दल माहिती तो गोळा करीत असण्याची शक्यता आहे. तूर्त लष्करी दृष्ट्या त्याला कांहींच महत्त्व नाहीं. परंतु त्यापासून मिळालेली माहिती व त्याला सोडण्याच्या प्रयोगांतील अनुभव यांचा दूरगामी रॉकेट अस्त्रांच्या निर्मितीमध्यें फार उपयोग होईल. इतकेंच नव्हे तर पुढें मागें अशा कृत्रिम उपग्रहाचा लष्करी दृष्ट्याहि उपयोग करतां येईल. या उपग्रहाच्या यशानें चंद्र व इतर ग्रहावर स्वारी करण्याच्या ध्येयांतला एक महत्त्वाचा टप्पाहि मानवानें ओलांडला आहे.

---

## पुस्तक-परामर्श

**[ हिंदुस्थानांतील धार्मिक इतिहासाचें सामान्य निरीक्षण ले.– डॉ. शं. दा. पेंडसे प्रकाशक– नागपूर विद्यापीठ, नागपूर मूल्य एक रुपया ].**

नागपूर विद्यापीठाच्या कै. रा. ब. श्रीधर गणेश परांजपे व्याख्यानमालेंत, १९४५ सालीं, 'हिंदुस्थानच्या धार्मिक इतिहासाचें सामान्य निरीक्षण' या विषयावर डॉ. शं. दा. पेंडसे यांनीं दिलेलीं तीन व्याख्यानें प्रस्तुत पुस्तकांत संग्रहित केलेलीं आहेत. "अनेक जाति आणि वंश, उपासनापंथ व संप्रदाय यांना आपल्यांत सामावून घेणारा, त्या सर्वांपेक्षां व्यापक व वरिष्ठ असणारा व सर्वांना आचरणीय असा जो हिंदुस्थानांतील मानवधर्म, त्याचा विकास कसा होत गेला याचें सामान्य–सूक्ष्म नव्हें–निरीक्षण प्रस्तुत व्याख्यानांत केलें आहे." (प्रास्ताविक) आणि विषयानुरोधानें बौद्ध आणि जैनधर्म, ज्यू आणि पारशीधर्म, खिस्ती व महंमदीधर्म यांची थोडथोडी माहिती प्रस्तुत पुस्तकांत आली आहे.



अनुक्रमणिका

धर्मलक्षण, धर्मप्रयोजन व धर्मप्रामाण्य याबद्दलच्या विचारांत कसकसा बदल होत गेला याचें निरूपण पहिल्या व्याख्यानांत झालें आहे. आधिभौतिक, आधिदैविक आणि आध्यात्मिक असा धर्मस्वरूपांत बदल झाला. त्याच्या अनुषंगानेंच धर्मप्रामाण्याच्या कल्पनेंतहि फरक पडत गेला. आणि " अशा रीतीचा अध्यात्ममूलक परंतु यज्ञ किंवा कर्मप्रधान असा आपला धर्म हा अखिल मानवांचा धर्म आहे. " (पृ. २२) असें डॉ. पेंडश्यांचें मत आहे.

या धर्मानें व्यक्तिजीवनाचें जें आदर्शभूत रूप रेखाटलें आहे त्याचें चित्रण दुसऱ्या व्याख्यानांत सांपडतें. व्यक्तिजीवनाच्या विकासासाठीं मन व बुद्धि यांवर संस्कार होणें आवश्यक असल्यानें सोळा संस्कारांची संस्था उदयास आली. त्यांतील उपनयन व विवाह हे दोन महत्त्वाचे असल्यानें ब्रह्मचर्य व गृहस्थ या आश्रमांतील व्यक्तिजीवनाचें जरासें सविस्तर वर्णन, आणि वानप्रस्थ व संन्यास या आश्रमांतील जीवनाचें थोडक्यांत वर्णन दुसऱ्या व्याख्यानांत येतें.

समाजाचा घटक या नात्यानें गृहस्थाचीं समाजाविषयीं कांहीं कर्तव्यें असतात. या अनुषंगानें आपल्या देशांतील समाजाची घटना कशी झाली आहे व गृहस्थाचीं सामाजिक कर्तव्यें कोणतीं याचा विचार करतांना वर्ण, यज्ञकल्पनांचा विकास आणि सामुदायिक धर्म यांचा विचार तिसऱ्या व्याख्यानांत आला आहे. चातुर्वर्ण्य कसें झालें; पशुयज्ञ, अन्नयज्ञ इत्यादि पासून तों यज्ञाच्या बाह्य अवडंबरापेक्षां त्यांतील त्यागाच्या तत्त्वाचें पालन म्हणजेच यज्ञ अशी वरच्या दर्जाची कल्पना कशी रूढ होऊं लागली; सामुदायिक यज्ञाचें रूपक ऋग्वेदांतील पुरुषसूक्तांत असून यज्ञ व धर्मकल्पनेचा पूर्ण विकास झालेला त्यांत कसा दृष्टीस पडतो इत्यादि भाग या व्याख्यानांत आढळतो. आणि शेवटीं शेवटीं " आमचे खिस्ती व महंमदी बांधव मानवधर्मांतील वर्णधर्माचा जर स्वीकार करतील व साकाराच्या पूजेविषयीं सहिष्णुता दाखावितील तर त्यांच्या उपासनापंथाचा त्यांच्या पारलौकिक तत्त्वज्ञानासहित आमच्या मानवधर्मांत सहज समावेश होऊन जाईल " ( पृ. ६० ) असें मत डॉ. पेंडश्यांनीं व्यक्त केलें आहे.

या छोट्या ग्रंथांतील बरीच विधानें विवाद्य स्वरूपाचीं आहेत. उदा०, " भारतीय समाज संघटित करण्याचें वर्णव्यवस्था हें अमोघ साधन आहे " ( पृ. ४९ ) ";
"स्वर्ग म्हणजे हिंदुस्थानच्या उत्तरेकडील उंचवट्याचा प्रदेश, मृत्युलोक म्हणजे उत्तरेकडील मैदानी प्रदेश व पाताळ म्हणजे विंध्याद्रीच्या दक्षिणेकडील प्रदेश " ( पृ. ४२ ); " ( ऋग्वेदांत उल्लेखिलेले) कृष्ण हे वैष्णव...होते " (पृ.४७); " (बौद्ध आणि जैन धर्म यांनीं वेदानुयायित्व बहुधा कधींच पत्करलें नव्हतें ) त्यामुळें त्यांना कर्मवादाचें रहस्य कळलें नव्हतें" (पृ.१४); "बुद्धाच्या तत्त्वज्ञानाचा निराळया स्वरूपांत शंकराचार्यांनी पुढें पुरस्कार केला. त्याच्या संन्यासांतील अतिरेक टाकून मर्यादित स्वरूपांत त्याचा स्वीकार केला. म्हणून त्यांना मीमांसक प्रच्छन्न बौद्ध म्हणूं लागले " (पृ.१३), इत्यादि.

हिंदुस्थानांतील धर्म हा मानवधर्म होण्यास योग्य आहे. (त्यासाठीं) खिस्ती व महंमदी बांधवांनीं वर्णधर्माचा स्वीकार करावा अशी डॉ. पेंडश्यांची भूमिका दिसते. येथें त्यांचें धर्मांतर अभिप्रेत आहे काय ? असल्यास, त्यांचे 'वर्ण' कोणी व कोणत्या तत्त्वावर ठरवायचे ? नसल्यास, 'वर्ण' न स्वीकारतां वर्णधर्माचें पालन करावयाचें काय ? तसेंच, पूर्वींचे वर्णधर्म सद्यःकालीं कोणत्या स्वरूपांत आचरतां येतील ? इत्यादि जे अनेक प्रश्न निर्माण होतात त्यांचा समाधानकारक खुलासा येथें सांपडत नाहीं.

हिंदुस्थानांतील धार्मिक इतिहासाचें सामान्य निरीक्षण म्हटल्यावर अशी अपेक्षा निर्माण होते कीं शैव, वैष्णव, महानुभाव, वारकरी, सिख, आर्य, ब्राह्मो, प्रार्थनासमाज इत्यादि जुन्या व नव्या पंथांची वा संप्रदायांची 'सामान्य' कां होईना माहिती या ग्रंथांत येणें आवश्यक होतें. या उलट, वर्णाश्रमधर्माचेंच प्राधान्येंकरून विवेचन या पुस्तकांत झालें आहे असें दिसून येतें. त्यामुळें इतिहासाच्या दृष्टीनें हें 'सामान्य' निरीक्षण सामान्य झालें आहे, समाधानकारक झालें नाहीं असें मत होतें.

—के. वा. आपटे

---














अनुक्रमणिका

राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत




द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई